पेशवे दप्तर अभिलेखमाला

वर्णनात्मक सूची, खंड २

# संशोधनासाठी निवडलेले कागद

## वर्णनात्मक सूची

### खंड १, विभाग २



संपादक :

डॉ. भ. ग. कुंटे,

एम. ए., पीएच्. डी. (अर्थशास्त्र)

व

पीएच्. डी. (इतिहास)

संचालक, पुराभिलेख विभाग,

महाराष्ट्र शासन

[किंमत रु.-२३·००]

# INTRODUCTION

A vast collection of historical documents is housed in the *Peshwa Daftar*, Pune, now called Pune Archives. Among this collection, there is a section viz., "PAPERS SELECTED FOR RESEARCH". This section contains 59 *Rumals*. A descriptive catalogue of the first 27 *Rumals* was published in 1978.

This is the Second Volume which contains descriptive catalogue of documents numbering 15098 to 27183 from *Rumal* Nos. 28 to 59. They cover the period from A. D. 1630 to 1848. The earliest document relates to A. D. 1630 about the *Sanad* granted by Shri *Chhatrapati* Shivaji Raje to Kulkarni of Mouje Bhose and Mutha of Pune District.

The documents in this catalogue are classified according to different categories of papers i.e., *Adnyapatra, Abhaya Patra, Yadies, Kabaz* (money receipt etc.), *Karar* (Agreement), *Talebandi* (Accounts), *Danpatra* (gift documents), *Farmans* and letters addressed to *Chhatrapatis, Peshwas, Sardars* and other notable personalities. Every *Rumal* contains documents of all the abovementioned types. There are three *Rumals* (viz., *Rumal* Nos. 45, 46 and 47) which are in English.

The documents in this catalogue mostly belong to the period of *Peshwa* Bajirao I, Balaji Bajirao *alias* Nanasaheb, *Peshwa* Madhavrao Ballal I and the beginning of British Period.

The first four *Rumals* viz., Nos. 28 to 31 contain information about the different types of grants viz., *Inam* lands, Cash allowances, *Mokasa, Sardeshmukhi*, etc., granted to different persons by the *Peshwas*. They also contain information about the correspondence between Bajirao Raghunath and Trimbakji Dengale, revolts of Bhils and Pendharis in Khandesh and about the measures (*Bandobast*) against them and some information about Holkar and the day-book of Balaji Janardan.

The documents in *Rumal* Nos. 31 to 38 give information about the movements of Daulatrao Shinde, Trimbakji Dengale, etc., and lists of the villages situated on different routes. Letters written by and to among the notable personalities viz., Parsoji Bhosale, Mudhoji Bhosale, Trimbakji Dengale, etc. They also throw light about the relations and the correspondence between the Maratha *Sardars* like Natu, Raste, Mirajkar, Ghorpade, Patwardhan, Bhosle with the British. They also contain papers regarding murder of Gangadhar Shastri Patwardhan by Trimbakji Dengale.

*Rumal* Nos. 39 to 43 contain diaries of Pratap Sinh Maharaj of Satara. The entries in these diaries show the relations of the Maharaja with the British and other States. They also contain information about *inam* grants, Government correspondence, Political, Judicial matters, etc. The period of these papers is from A. D. 1818 to 1838.

*Rumal* No. 44 relates to the correspondence about the revolts of Pendharies and Bhils in Khandesh. It also contains the correspondence between Kolhapur Chief and the British Officers *viz.*, Warden, Chaplin, Bell, Jonathan Duncan, etc.

Correspondence in *Rumal* Nos. 45, 46 and 47 is in English. They contain information about *abkari* rights, accounts, administrative matters, construction of and repairs to bridges, buildings, hospitals, etc. The period covered by these papers is from 1793 to 1829 A. D.

*Rumal* Nos. 48 to 53, contain documents such as *Adnyapatra, Yadies, Jabatas, Zadaties* and *Rajpatra* issued by Balaji Bajirao, Daulatrao Shinde, Madhavrao Narayan, *Sachiv, Pratinidhi*, etc.

The documents in *Rumal* Nos. 54 to 59, relate to the correspondence of Bajirao Raghunath, Fatesing Bhosale, Madhavrao Ballal, Yeshwantrao Holkar and other notable personalities. They also contain *Kararnamas, Talebandi, Farmans, Yadies, Adnyapatra* and day-books of Pratap Sinh Maharaj of Satara. *Rumal* No. 59, Bundle No. 7 contains 46 letters which are written in code language.

It will thus be seen that the documents in the abovementioned *Rumals* throw considerable light on all the aspects of the Maratha rule during 17th and 18th centuries and hence they are quite useful and important to a research Scholar. The Department of Archives is, therefore, very happy to place this valuable and useful reference catalogue in the hands of the Research Scholars and students of History.

The preparation of this catalogue has taken a fairly long time due to the typical nature of the work involved. This project was started by the Director of Archives, Shri V. G. Khobrekar and carried out by Research Assistant M. M. Omkar, Compilers Servashri H. N. Bakshi, V. S. Bhat, Smt. S. Y. Deshpande, Smt. P. D. Bhingarkar and Smt. M. C. Kanekar. To all these colleagues my thanks are due.

I am also thankful to Shri S. A. Sapre, Director, Government Printing and Stationery, and Shri L. J. Menesse, Manager, Government Press and Book Depot, and the staff of the Nagpur Press for Printing the Volume expeditiously.

Dr. B. G. KUNTE,
Director of Archives,
Government of Maharashtra.

Bombay:
1st January 1979.

## दप्तर क्रमांक २८

### पुडके क्रमांक १ ते ९

### पुडके क्रमांक १

का. सं. ११७ (१५०९८-१५२१४), सु. स. ११७५-१२१६, इ. स. १७७४-१८१५.

**आज्ञापत्रें :**

**पंत प्रधान** (बाजीराव रघुनाथ)—**मोकदम, भरांडी** : नीळकंठराव रामचंद्र याजकडील शिलेदार शेखला, शेख सुज्यात व शेख कुतुब यांच्याकडे मुशाहिऱ्याबद्दल असलेल्या भरांडी गांवच्या खेरिज मुकासा अंमलाच्या जप्तीच्या ऐवजाचा भरणा करण्याबद्दल, ७ रमजान, सु. १२०४/२२ डिसें. १८०३ (१५१६६) ;—**मोकदम, कडूस**: बाळाजी केशव याच्या कारकिर्दीतील बाकी ऐवजाचा हुजूर भरणा करण्याबद्दल, ११ मोहरम, सु. १२०४/२२ एप्रिल १८०४ (१५१६७) ; महिपतराव कृष्ण याजकडून ऐवजाचा भरणा, ७ जिल्हेज, सु. १२०४/२० मार्च १८०४ (१५१८१) ;—**मोकदम, गोलेवाडी** : कदम कडू याजकडे असलेल्या चाकणच्या जप्तीच्या ऐवजाचा भरणा, १९ ज. वल, सु. १२०४/६ सप्टेंबर १८०३ (१४१८०) ;—**येसजी आप्पाजी टेमगिरे पाटील, भरतगांव** : चितामणराव पांडुरंग याच्या तफावतीच्या ऐवजाचा भरणा, ७ जिल्हेज, सु. १२०४/२० मार्च १८०४ (१५१८२) ;—**मोकदम, भुरटी** : आनंदराव गोविंद याच्या कारकिर्दीतील बाकी ऐवजाचा भरणा, २९ मोहरम, सु. १२०४/१० मे १८०४ (१५१८३) ;—**मोकदम, खेड** : सदाशिव दिनकर याच्या कारकिर्दीतील बाकी ऐवजाच भरणा, ९ मोहरम, सु. १२०४/२० एप्रिल १८०४ (१५१८४) ;—**मोकदम, पिंपलवाडी** : पिंपलवाडीकडे बाकी असलेल्या ऐवजाचा भरणा, ७ जिल्हेज, सु. १२०४/२० मार्च १८०४ (१५१८५) ;—**मोकदम, आंबोली** : विठोबा नाईक तांबेकर यांनी त्रिंबकराव चितामण यांजकडून सरकार बाकी देवविली तिचा भरणा, २ रमजान, सु. १२०४/१७ डिसें. १८०३ (१४१९६) ;—**मोकदम, बहुळ** : बहुळकडे असलेल्या खंडोजी निकम याच्या कारकिर्दीतील ऐवजाचा भरणा, २४ सफर, सु. १२०४/३ जून १८०४ (१५१९७) ;—**मोकदम, घोडे** : जुन्नरच्या देशमुखी वतनतंटयातील बाजी यादव याच्या गुन्हेगारीच्या ऐवजाचा भरणा, २ मोहरम, सु. १२०४/१३ एप्रिल १८०४ (१५१९८) ;—**मोकदम, चोपड**: बाळाजी हरी याच्या कारकिर्दीतील मौजे चोपड येथील बाकी भरणा, ११ मोहरम, सु. १२०४/२२ एप्रिल १८०४ (१५१९९) ;—**मोकदम, माहाळुंगे** : घोडे व माहाळुंगे तर्फांच्या देशमुखी तंटयातील बाजी यादव याच्या गुन्हेगारीच्या ऐवजाचा भरणा, २ मोहरम, सु. १२०४/१३ एप्रिल १८०४ (१५२००) ;—**मोकदम, पलसदेव** : गणेश बाजीराव याजकडे असलेल्या पलसदेव येथील जप्तीच्या कमाविशीच्या ऐवजाचा भरणा, ७ रमजान, सु. १२०४/२२ डिसें. १८०३ (१५२०१) ; कुलकर्णाच्या जप्तीचा ऐवजभरणा, १७ रजब, सु. १२०४/३ नोव्हें. १८०३ (१५२०२) ;—**मोकदम, धामणी** : सटवाजी महाडिक याजकडील जप्तीच्या कमाविशीच्या ऐवजाचा भरणा, १९ ज. वल, सु. १२०४/६ सप्टें. १८०३ (१५२०३) ;—**मोकदम, आळंदी** : सरकार जप्तीतील आळंदीचे ज्योतिष व कुलकर्णाबद्दलच्या ऐवजाचा भरणा, ७ जिल्हेज, सु. १२०४/२० मार्च १८०४ (१५२०५) ;—**मोकदम, वडगांव** : सटवाजी महाडिक याजकडे असलेल्या वडगांवच्या जप्तीच्या कमाविशीतून सरकारांत ऐवजभरणा, २० साबान, सु. १२०४/५ डिसें. १८०३ (१५२०६) ;—**रत्नोजी व देवजी पाटील, पिंपळवाडी** : शहाजी व सिदोजी पाटील व कुलकर्णी याजकडून यावयाच्या तफावतीच्या ऐवजाचा भरणा, ५ जिल्हेज, सु. १२०४/१७ जाने. १८०४ (१५२०७) ;—**मोकदम, पिंपळगांव**: सटवाजी महाडिक याच्या पिंपळगांवच्या जप्तीच्या कमाविशीतून सरकारात ऐवजभरणा, १९ ज. वल, सु. १२०४/६ सप्टें. १८०३ (१४२०९) ;—**मोकदम, घोरपडी** : पुण्याकडे बाकी असलेल्या ऐवजाचा भरणा, २० साबान, सु. १२०४/५ डिसें. १८०३ (१४२१०) ; रामचंद्र कृष्ण याच्या नेमणुकीच्या ऐवजाचा भरणा, १७ रजब, सु. १२०४/३ नोव्हें. १८०३ (१५२११).

**बाजीराव रघुनाथ प्रधान**—**कमाविसदार, महलानिहाय** : फत्तेखान रिसालदार दिा गिरीम इंग्रज याचे कविजंग याजकडून यावयाचे कर्जास अडथळा करणाऱ्या वेले महंमदाचे पारिपत्यासाठीं शेख महंमद याची रवानगी, ९ सवाल, सु. १२१४/४ ऑक्टो. १८१३ (१५०९८) ;—**नरसो तुकदेव** : परशराम रामचंद्र व रामचंद्र परशराम यांच्या सरंजामी महालाची जप्ती करून त्याची कमाविशी सांगितल्याबद्दल, सु. ११९७/इ. स. १७९६-९७ (१५०९९) ;—**बापूजी गणेश** : लोणी येथील कमाविशी येसाजी पवार यास देण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (१५१०१) ;

आज्ञापत्रे : चालू—

किल्ले भूषणगडची मामलत येसाजी पवार यांस देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५१०५**); मनोहरगीरकडे किल्ले मलंगगड येथील मामलत देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५१०७**); सदाशिवगडची मामलत कचो राम याच्या हवाली करण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५१०८**); व्याघ्रगड उर्फ वासोटयाची मामलत गंगाधर बाळकृष्ण यांस देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५१०९**); प्रचितगड व वारुगडची मामलत रघुनाथ मोरेश्वर याजला देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११०-१५१११**); वसंतगडची मामलत रामचंद्र महादेव याजला देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११२**); रामचंद्र पांडुरंग यास महिमानगड व कमलगडची मामलत देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११३-१५११४**); मच्छिद्रगड येथील मामलत धोंडो विश्वनाथ यांस देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११५**); महिमंडणगडची मामलत जनार्दन नारायण यांस देण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११६**); महिपतगडची मामलत येसाजी पवार याच्या स्वाधीन करण्याबद्दल, १६ ज. खर, सु. १२१२/८ जुलै १८११ (**१५११७**); येसाजी पवार याजकडे कऱ्हाडची कमाविशी देण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (**१५११८**); विठोजी कारके याजला परगणे भालवणीची कमाविशी देण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (**१५११९**); त्रिबकजी डेंगळे यांस परगणे नाझरेची कमाविशी देण्याबद्दल, १२ रमजान, सु. १२१२/१ ऑक्टो. १८११ (**१५१२०**); त्रिबकजी डेंगळे यास ठाणे वारुण, कऱ्हाड, खानापूर, तर्फ कोले येथील कमाविशी देण्याबद्दल, १२ रमजान, सु. १२१२/१ ऑक्टो. १८११ (**१५१२१-१५१२४**); किन्हई व पुसेसावळी येथील कमाविशी येसाजी पवार याजकडे देण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (**१५१२५-१५१२६**); परगणे कासेगांव व येलापूरची कमाविशी विठोजी कारक यास दण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (**१५१२७-१५१२८**); परगणे आकलुजची कमाविशी कारके याजकडे देण्याबद्दल, १० सवाल, सु. १२१२/२९ ऑक्टो. १८११ (**१५१२९**);—**आनंदराव धुळप** : सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (**१५१०३**);—**गोविंदराव सदाशिव** : १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (**१५१०६**);—**गोविंद राम** : १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (**१५१३०**);—**आप्पाजी बहिरट** : १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (**१५१३१**); गुहागर येथील सरकारी वाडा बांधण्यास मोर दीक्षित यास मदत करणाबद्दल, ७ मोहरम, सु. १२११/२ फेब्रु. १८११ (**१५१५९**);—**बळवंतराव अनंत** : बंडवाल्यांकडे चाकरीस गेलेल्या लोकांच्या बंदोबस्ताबद्दल, १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (**१५१३२**);—**देशमुख देशपांडे, परगणे सुलतानपूर** : अमृतराव, संताजी, भगवंतराव, यशवंतराव, त्रिबकराव व बळवंतराव सरकारचाकरीस नसल्यामुळे त्यांचा सरंजामी परगणा सुलतानपूर हा त्यांचेकडून काढून घेतल्याबद्दल, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (**१५१३३**);—**महादजी रघुनाथ** : तालुके अवचितगडची मजमू प्रभाकर अनंत गोडबोले यास देण्याबद्दल, २२ जिलकाद, सु. ११९८/९ मे १७९८ (**१५१३४**);—**नारो गोविंद** : इमाम जाफरमिया याने बाळाजी जनार्दन यास दिलेली कोथरुड येथील जमीन सरकारांत जप्तीस असल्याने त्याजकडून (इमाम जाफरमिया) घ्यावयाची साऱ्याची रक्कम गावच्या खंडणीतून वजा करून बाकी वसूल घेण्याची आज्ञा, २ ज. खर, सु. १२०२/११ ऑक्टो. १८०१ (**१५१३६**);—**रामचंद्र बल्लाळ** : बडेसिंगे येथील कमाविशी दिल्याबद्दल, १२ सवाल, सु. १२१६/१६ सप्टें. १८१५ (**१५१३८**);—**यादव सामराज** : मुल्हेर येथे अटकेत असलेल्या जयराम जनार्दन यास बंदोबस्ताने पाठवून देण्याबद्दल, २९ जिल्हेज, सु. ११९९/४ जून १७९८ (**१५१३९**);—**रामचंद्र नारायण** : धामणे येथील मोकासा व बाबती यशवंतराव दाभाडे यांजकडे दिल्याबाबत, १४ रमजान, सु. ११९९/२० फेब्रु. १७९९ (**१५१४१**);—**लक्ष्मण हरि कमाविसदार** : जिवाजी यशवंतराव यास सामील असलेल्या लोकांची घरे जप्त करण्याबद्दल, सु. १२०१/इ. स. १८००-१८०१ (**१५१५७**); शिवनेर येथील बंडवाल्यांस मिळालेल्या शिवनेरच्या लोकांची वतने जप्त करण्याबाबत, १ र. खर, सु. १२०४/२१ जून १८०३ (**१५१६३**);—**सदाशिव भास्कर** : बंडवाल्यांना सामील झालेल्या विसापूर येथील लोकांच्या बंदोबस्ताबद्दल, १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (**१५१४३**);—**काशिनाथ** : पारनेर येथील मामलतीवर नेमणुक केल्याबद्दल, १ रमजान, सु. १२०४/१६ डिसें. १८०३ (**१५१४४**);—**नारायणराव यादव** : यशवंतराव चत्रसिंग कदम बांडे याजकडे परगणे सुलतानपूर व

**आज्ञापत्रे : चालू—**

नंदुरबारचा मोकासा अंमल फौजेचे सरंजामास दिल्याबद्दल, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (**१५१४५**) ; —**मोरो हरि** : नेवासे येथील पोतनिसीवर असलेल्या सीताराम अनंत याच्या वेतनाची तरतूद करण्याबद्दल, सु. १२०७/इ. स. १८०६-१८०७ (**१५१४६**) ; —**राणोजी पवार विश्वासराव** : विश्वासराईचे सरंजामाच्या फडणिशीवर रघुनाथ चिंतामण याची नेमणूक, इ. स. १७९८-१८१८ (**१५१४७**) ; —**त्रिंबकजी डेंगळे** : बहादूरपुरा, गुजराथ येथील मामलतीवर प्रापकाची नेमणूक केल्याबद्दल, ५ साबान, सु. १२०८/८ ऑक्टो. १८०७ (**१५१४८**) ; देहजबारे, प्रांत गुजराथ येथील मामलतीवर प्रापकाची नेमणूक केल्याबद्दल, ५ साबान, सु. १२०८/८ ऑक्टो. १८०७ (**१५१४९**) ; आमोद, प्रांत गुजराथ येथील मामलतीवर प्रापकाची नेमणूक केल्याबद्दल, १७ रजब, सु. १२०७/३० सप्टें. १८०६ (**१५१५०**) ; —**परशराम केशव** : वर्धनगड येथील किल्लेदारीवर प्रापकाची नेमणूक केल्याबद्दल, सु. १२१२/इ. स. १८११-१८१२ (**१५१५५-१५१५६**) ; —**माधवराव नीळकंठ** : जिवाजी यशवंत यास सामील झालेल्या लोकांची मिळकत जप्त करण्याबाबत, सु. १२०१/इ. स. १८००-१८०१ (**१५१५८**) ; —**आबाजी कृष्ण** : गुहागर येथील सरकारवाड्याचे बांधकामास लागणाऱ्या सामानाची तजवीज करण्याबद्दल, १ मोहरम, सु. १२०१/१५ मे १८०१ (**१५१६०**) ; —**सदाशिव केशव** : साष्टी व मुंबईहून परवानगी नसता विक्रीसाठी गाई बाहेर जातात त्याचे बंदोबस्तासाठी पाठविलेल्या अनंत नाईक यास मदत करण्याबाबत, १५ मोहरम, सु. ११९९/३० जून १७९८ (**१५१६१**) ; —**भवानीशंकर हैबतराव** : बंडवाल्यांकडे चाकरीस असलेल्या वाई प्रांतीच्या लोकांची वतनें जप्त करण्याबद्दल, १ र. खर, सु. १२०४/२१ जून १८०३ (**१५१६२**) ; —**खंडेराव नीळकंठ** : बंडवाल्यांस सामील असलेल्या कोहज येथील लोकांची वतने जप्त करण्यासंबंधी, १ र. खर, सु. १२०४/२१ जून १८०३ (**१५१६४**) ; —**बाजी दिनकर** : अहमदाबाद व गुजराथ येथील मामलत त्रिंबकजी डेंगळे याजकडे सोपविल्याबद्दल, सु. १२१३/इ. स. १८१२-१३ (**१५१६५**) ; —**देशमुख व देशपांडे, काटी** : वडाली गांवावर मनोरगीर याची नेमणूक, ७ सवाल, सु. १२०४/२१ जाने. १८०४ (**१५१६८**) ; —**हवालदार व कारकून, सुवर्णदुर्ग** : सुवर्णदुर्गचे किल्लेदारीवर सदाशिव माणकेश्वर याची नेमणूक, १७ मोहरम, सु. १२०४/२८ एप्रिल १८०४ (**१५१६९**) ; —**आबाजी दादाजी** : होनाजी मल्हारजी डेंगळे यांची किल्ले बहुला येथील हवालदारीवर नेमणूक, १९ साबान, सु. १२०४/४ डिसें. १८०३ (**१५१७०**) ; —**हरी गणेश गोसावी** : आगासी व भिवंडी येथील कमाविशीवर नेमणूक केल्याबद्दल, २६ र. खर, सु. १२०५/३ ऑगस्ट १८०४ (**१५१७१**) ; —**कारकून दिमत त्रिंबकराव नारायण** : कोसींबी व गोटे येथील कमाविशी त्रिंबकराव नारायण याजकडून दूर केल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (**१५१७३**) ; —**कारकून दिमत महंमद जमालुद्दीखान नगरकर** : फौजेचे बेगमीस असलेला नेवासे महाल दूर केल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (**१५१७५**) ; —**धोंडो बल्लाळ** : सरकार चाकरीत नसलेल्या पुरंदर व वज्रगड येथील लोकांची मिळकत जप्त करण्याबद्दल, १० ज. वल, सु. १२०४/२८ ऑगस्ट १८०३ (**१५१७९**) ; —**परशराम खंडेराव** : सरकारी कारखान्याकडील लोकांस कोकणांतून इमारतीसाठीं लांकडे आणू देण्याबद्दल १६ जिलकाद, सु. १२१२/३ डिसें. १८११ (**१५२०४**).

**रघुनाथ बाजीराव—नरोत्तम किशोरदास** : इंग्रजांनी सुचविलेला तह मान्य करूनहि इंग्रजांची मदत येण्यास उशीर, बारभाईस निजामअलीची मदत व त्यांचे नजीक आगमन त्यामुळे माळव्यात फौजबंदी करून यावयाचा विचार, ५ सवाल, सु. ११७५/९ डिसें. १७७४ (**१५१४०**).

**व्यंकटराव राजे घोरपडे मुधोळकर—गव्हर्नर** : मुधोळच्या पूर्वजांनी मिळविलेल्या महालांची वहिवाट पूर्वीप्रमाणेच चालू रहावी म्हणून, १३ जाने. १८२१ (**१५१३७**).

**हरी नारायण पुरंदरे—बाळाजीपंत** : किल्ल्याचा बंदोबस्त बाबा व आण्णा यांच्या सल्ल्यानुसार योग्यप्रकारे चालल्याबद्दल, पै. ३ रजब, सु. १२०८/६ सप्टें. १८०७ (**१५१७७**).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली)**

**बाजीराव रघुनाथ प्रधान** —(—) : परशराम प्रतिनिधीकडील सरंजामी महाल बापूजी गणेश गोखले याजकडे दिले त्यातील वनचराईचा अंमल काढून घेतल्याबद्दल, सु. १२१४/इ. स. १८१३-१४ (**१५१००**) ; दंडा—राजपुरीचा कमाविशीचा अंमल प्रापकाकडे सांगितल्याबद्दल, २२ जिलकाद, सु. १२११/२० डिसें. १८१० (**१५१०२**) ; कदम बांडे वगैरेंकडील नंदुरबार व सुलतानपूर या सरंजामी परगण्याबाबत, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (**१५१३५**) ; प्रांत बेलापूरची मामलत दिल्याबद्दल, २०

**आज्ञापत्रे : चालू—**

साबान, सु. १२०९/११ ऑक्टो. १८०८ (१५१४२); मच्छिंद्रगडचे बेगमीस दिलेल्या महालाच्या उत्पन्नाचा तपशील, सु. १२१२/इ. स. १८११-१८१२ (१५१५१–१५१५४); पुणे शहरांतील नाकेबंदीचे काम नारो शिवराम याजकडून दूर केल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (१५१७२); कोसींबी व गोटे येथील जमीन अन्नछत्राचे बेगमीस दिल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (१५१७४); आटेगांवची मामलत रघुनाथ धोंडदेव यांजकडून दूर केल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (१५१७६).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेले)**

(—)—**नीलो महादेव** : तर्फ आटेगांव येथील रसदबाकी सरकारांत भरण्याबद्दल आज्ञा, २४ सफर, सु. १२०४/१५ जून १८०३ (१५१९४).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं)**

पांडुरंग ढमढेरे व चिंतोराव देशमुख यांच्या नांवे झालेल्या वरातांच्या मखलाशीच्या याद्या पाठविणे व कोंकणच्या वगैरे लोकांच्या रोजमुऱ्याची व्यवस्था करण्याबद्दल, पै. १० र. वल, आर्बा (१५१०४); कर्नाटक स्वारीचे दप्तरासाठीं जागा देण्याबद्दल, (१५१७८).

**सरकारी चिठ्या** :

(—)—**रघुनाथ त्रिंबक** : राजेश्वरभट पैठणकर यांचे कर्जफेडीसाठीं त्रिंबक कृष्ण यांच्याकडे दिलेल्या ऐवजाचा भरणा करण्याबाबत, ७ रमजान, सु. १२०४/२२ डिसें. १८०३ (१५१८६).

(—)—**गणेश कृष्ण** : दप्तरदारीच्या राहिलेल्या ऐवजाची मागणी, ४ साबान, सु. १२०४/१९ नोव्हें. १८०३ (१५१८७).

(—)—**जगन्नाथ वासुदेव** : बापूजी वासुदेवाच्या अमिनीच्या रसदेचा सरकारांत भरणा, १९ ज. वल, सु. १२०४/६ सप्टें. १८०३ (१५१८८).

(—)—**बापूजी बल्लाळ** : नेरळ येथील मामलतीबाबतच्या तफावतीचा ऐवजभरणा, ४ साबान, सु. १२०४/१९ नोव्हें. १८०३ (१५१८९).

(—)—**आत्माराम रंगनाथ** : कुंभारीच्या मामलतीच्या बाकी ऐवजाचा भरणा, ७ रमजान, सु. १२०४/२२ डिसें. १८०३ (१५१९०).

(—)—**आत्माराम राजाराम** : कुंभारीच्या मामलतीचा ऐवजभरणा, ७ सवाल, सु. १२०४/३१ जाने. १८०४ (१५१९१).

(—)—**विश्वनाथ नारायण** : पिंपळवाडीच्या कमाविशीच्या बाकी ऐवजाचा भरणा करण्याबद्दल, ७ जिल्हेज, सु. १२०४/२० मार्च १८०४ (१५१९२).

(—)—**विठ्ठल नारायण** : प्रांत कल्याण, भिवंडीच्या मामलतीच्या बाकी ऐवजाचा भरणा करण्याबद्दल, ५ साबन, सु. १२०४/२० नोव्हें. १८०३ (१५१९३).

(—)—**मल्हार आप्पाजी** : करारानुसार आप्पाजी बल्लाळ याजकडील तफावतीच्या ऐवजाचा भरणा करण्याबद्दल, ९ मोहरम, सु. १२०४/२० एप्रिल १८०४ (१५१९५).

(—)—**जोत्याजी माधवराव** : बाळाजी लक्ष्मण याच्या फडणिशीच्या वेतनाच्या बाकीपैकी ऐवज सरकारांत देण्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (१५२०८).

(—)—**श्रीनिवास शामराव मामलेदार, कऱ्हाड** : गणेश आप्पाजी याजकडून खटाव वगैरे मामलतीबाबत ऐवज येणे तो गोविंदराव सदाशिव यांस देण्याबद्दल, सु. १२१२/इ. स. १८११-१८१२ (१५२१२).

(—)—**बाळाजी व्यंकटेश** : पुरंदऱ्यांच्या पोतनिशीच्या ऐवजापैकी बाकीचा ऐवज भरणा करण्याबद्दल, १९ ज. वल, सु. १२०४/६ सप्टें. १८०३ (१५२१३).

(—)—**आबाजी मोरेश्वर** : मोरो वामन याजकडील तांबवे वगैरे गांवांकडून यावयाच्या ऐवजाची रुजुवात व त्याचा भरणा, ९ मोहरम, सु. १२०४/२० एप्रिल १८०४ (१५२१४).

## पुडके क्रमांक २

का. सं. ५६ (१५२१५-१५२७०), सु. स. ११८६-१२१८, इ. स. १७८५-१८१७.

**आज्ञापत्रे :**

**परशराम पंडित प्रतिनिधि—मोकदम, पुसेगांव** : खडर्याचे लढाईतील पराक्रमाबद्दल पुसेगांव हा गांव दौलतराव हैबतराव घाटगे यांस इनाम दिल्याबद्दल, २२ र. वल, सु. १२०१/१४ ऑगस्ट १८०० (**१५२४०**).

**चिठ्ठी :**

घोरपडी येथील वसुलाबाबत पाटील कुलकर्णी यांचा वायदा, ३ रमजान, पौष मास (**१५२३१**).

**नोंदी :**

काश्मीर देशांत जयसिंगाचे कुळांत जन्म घेऊन पराक्रम करणाऱ्या राजाचे भविष्य (**१५२२४**); ब्राह्मणांस संस्कृतमध्ये दिलेल्या पदव्यांची (**१५२६१**); वहिवाटीसंबंधीच्या नोंदी (**१५२६३–६४**).

**पत्रे :**

**अमृतराव रघुनाथ—रामचंद्र हरी** : रामाजी कोन्हेर यांचे सरदेशमुखी अंमलाची जप्ती व परगणे उमरखेड **येथे** गाजीखान मवास याने बखेडा केला त्याचे पारिपत्य करण्याबद्दल, १६ सवाल, सु. १२०३/९ **फेब्रु.** १८०३ (**१५२५५**).

**आनंदराव आप्पाजी—दादा** (रघुनाथराव): धामणेर गांव पेंढाऱ्यांनी लुटल्यामुळे जनार्दनपंत यांच्याकडील लाकडां**ची** भडगावास उशिरा रवानगी, २६ मोहरम (**१५२५२**).

**गणपतराव परशराम—पंत प्रधान** (बाजीराव रघुनाथ) : पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं काशिनाथपंत याज**बरोबर** फौज रवाना व त्या कामांत इंग्रजांची मसलत, ११ जिल्हेज (**१५२४४**).

**चिंतो वामन देशमुख—मोरोपंतबाबा चोळकर** : गुजराथकडील गांवांची इंग्रजांनी केलेली जप्ती, भोसले **यांजकडून** यात्रयाचा ऐवज, १० लक्ष रुपयांची शिंदे यांना दिलेली वरात व बेहडयाचा हिशेब पाठविण्या**बाबत,** ज्येष्ठ शु. १०, श. १७३०/४ जून १८०८ (**१५२६६**).

**चिस्तयारखान दिवाण—बदामीचे हैदर अमील** : कारखान्यासाठीं लोहार व बैल पाठविण्याबाबत दस्तक, **हिजरी** ११९९/इ. स. १७८५ (**१५२३०**).

**छत्रपति (प्रतापसिंह महाराज)—बाजीराव पंडित प्रधान** (बाजीराव रघुनाथ): त्रिंबकजी डेंगळे **यांजकडून** पंढरपूर यात्रा व मेजवानी याबद्दल ऐवज मिळाल्याबद्दल, १३ रमजान, सु. १२११/१३ **ऑक्टो.** १८१० (**१५२२१**).

**त्रिंबकजी डेंगळे—सदाशिवपंत व हरी भगवंत** : डाक वेळेवर येण्याबद्दल ताकीद, सरकारस्वारीचे कऱ्हाड, पाटण**वरुन** कोंकणातून गुहागर येथे गमन, पेंढाऱ्यांचा बंदोबस्त व डभईच्या वसुलीबाबत, ९ **मोहरम,** (**१५२४१**); मॅलेट यांचे मुलांस आषाढ व श्रावण महिन्याचे रु. १,००० देऊन पावती घेऊन **पाठवून** देण्याबाबत, १७ रजब, सु. १२१४/१६ जुलै १८१३ (**१५२२०**); बापू कोन्हेर यांचे का**गदपत्र** व रथ घेऊन नाशिक मुक्कामास आगमन, कांचेचे सामान व ऐवज विठ्ठलपंत यांजकडून **घेऊन** पाठविणे व बापू गोडबोले यांचा हिशेब व भवानीमातेचे दागिने पाठविण्याबाबत, ७ र. **वल,** (**१५२३३**); —**धोंडो गोविंद** : मैराळ नाईक याचे कर्जासाठी अटकावलेल्या मलप्पा **महाजन** महेतरकर याच्या मुलास सोडण्याबाबत, ३ रमजान, सु. १२१०/१३ ऑक्टो. १८०९ (**१५२४२**).

**धरमदास दुलभशेट—बाबासाहेब** (बाजीराव रघुनाथ): अमानत घेतलेले रुपये परत करण्याबाबत, श्रावण **शु.** प्रतिपदा, श. १७२३/१० ऑगस्ट १८०१ (**१५२७०**) ; —**नाना***, **आप्पा*** : बापू गोखले यांज**कडील** लोकांसमागमे बळवंतराव रास्ते किल्ले सिद्दीगड येथे दाखल झाल्याबाबत, पौष शु. ९, श. १७३८/**२७** डिसें. १८१६ (**१५२४३**).

**निळो विश्वनाथ—बाळाजीपंत** : गारदी यांनी लाकांना लुटून पळवून लावले व दौलत लुटली व शिंदे यांजकडून **गांव** मोकळे करुन घेतले (**१५२५८**).

**फत्तेसिंग भोसले—बापूराव गोसावी** : रामराव माने हे रुजु झाले नाहीत म्हणून त्याजकडील सरंजामाची जप्ती **करुन** कमाविशी आप्पाजी गोविंद यांजकडे सांगितल्याबद्दल, ९ मोहरम, सु. १२११/२४ फेब्रु. **१८११** (**१५२४५**).

**बाजीराव—राजे मर्दनसिंघजूदेव** : नारो गोपाळची चीजवस्तु देण्याबद्दल (**१५२२७**).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे: चालू—

**बाजीराव रघुनाथ—मामलेदार, माळवा**: बुंदेलखंड व हिंदुस्थान प्रांतातील सरंजामास व कमाविशीस असलेले महाल कंपनी सरकारकडे देण्याबाबत, ३० रजब, सु. १२१७/२७ जून १८१६ (१५२१५); **—नारो शिवराम**: निंबाजी भास्कर यांस पर्वती रमण्याच्या बागेचे कामकाज व उत्तरेकडील विहीर दिल्याबद्दल, २१ मोहरम, सु. १२०१/४ जून १८०१ (१५२३९); **—माधवराव अनंत**: कर्नाटक सरसुभा मोरो बापूजीकडून दूर करुन बाळोजी कुंजीर यांजकडे दिल्याबद्दल व जालेहलची वसुली, बंदोबस्त वगैरेबद्दल, १५ जिलकाद, सु. १२०१/३१ मार्च १८०१ (१५२३८); **—पर्वतराव भापकर**: आकोले गाव गोविंदराव भापकर यांस देण्याबद्दल, ५ मोहरम, सु. १२००/१० जून १७९९ (१५२३७); **—देशमुख, देशपांडे, सोलापूर**: रामचंद्रराव व सुलतानजी मांढरे शिलेदार यांजकडील बाणेगांवची जप्ती मोकळी केली त्याबाबत, २९ जिल्हेज, सु. ११९९/१५ जून १७९८ (१५२३६); **—रघुनाथ त्रिंबक**: बंडवाल्यास सामील असणाऱ्या अंजनवेलच्या लोकांची जमीन वगैरेची जप्ती करण्याबाबत, १ र. खर, सु. १२०४/२१ जुलै १८०३ (१५२३५); **—त्रिंबकजी डेंगळे**: कोकण सरसुभा खंडेराव नीळकंठ याजकडून दूर करुन खंडो परशराम याजकडे सांगितल्याबद्दल, ७ सवाल, सु. १२०६/२९ नोव्हें. १८०५ (१५२५१); **—माधवराव कृष्ण**: तोफखान्याच्या बेगमीस असलेल्या मखमली महाल किल्यासुद्धा त्रिंबकजी डेंगळे यांचे हवाली करण्याबाबत, २० रजब, सु. १२०८/२३ सप्टें. १८०७ (१५२३४).

**वीरवडेर सोंधेकर—मॅलेट**: इंग्रज व बाजीराव यांचा समझोता होऊन तो मनुष्य पुण्यास येत आहे त्याबाबत, २० जिलकाद (१५२१७).

**सदाशिवराव—पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ): श्रीगोंदे येथील वसुली व जप्तीचा ऐवज पाठविण्याबाबत, ६ रमजान, सु. ११९९/१२ फेब्रु. १७९९ (१५२२२).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं)**

**गणेश नारायण भट—(—)**: सिदगड घाटाकडील भिल्ल, कोळी यांच्या हालचालीवर देखरेख करण्याची सूचना व नारो बल्लाळ यांचे हिशेबाबाबत, ७ र. वल (१५२५९).

**गणेश श्रीपत—(—)**: शिवापूर, शिरवळ वाघोली, क्षेत्र माहुलीचा प्रवास व स्वारी धोंडीबाराव चव्हाण यांजकडे मेजवानीस गेली व दरबारांत काही ठराव झाले त्याबाबत, पौष व. ९, सु. १२१४/१४ जाने. १८१४ (१५२५७).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं)**

इंग्रजांशी झालेल्या लढाईत बापू गोखले याचा मृत्यु, इ. स. १८१८ (१५२१६); सोनगडाजवळ पेंढारी लोकांचा जमाव त्यामुळ कटकट होण्याचा संभव (१५२२३); खडसेर चौकीस नेमणुका व परगणे देहज वगैरे गांवाच्या लावणी, जमाबंदीसंबंधी (१५२२५); लखनौचा नबाब गाजुद्दीन हैदर याजकडून फिरंग्याकडे काशीपूर, गोरखपूर व अंतरवेद या मुलुखांची मागणी व लढाई करण्याचा इरादा (१५२२६); नारायणरावतात्या व बापूजी गणेश यांची खाजगी विषयावर चर्चा व त्यासंबंधी काही सूचना (१५२२८-१५२२९); विनायकपंत मराठे यांजबरोबरील पायदळापैकी कांही दिमतदारांनी ऐवज घेतला त्याबाबत (१५२३२); कसबे माहूर येथे श्री दत्तात्रयाची पूजा—अर्चा करणाऱ्या दत्तभारती यांस दर मासास रयतेकडून एक रुपया वर्षासन, सु. १२०२/इ. स. १८०१-१८०२ (१५२५३-१५२५४); मुरीकोंडा यांचे वाटेने सात पलटणींचे मोगलाचे मुलुखांत गमन, कर्नूलकर व गुलामअली बेंगणपलीवाला यांचे फौजेची हालचाल, ७ रमजान, सु. १२१८/२२ जुलै १८१७ (१५२५६); हणमंत सागराहून निघालेले लष्कर कृष्णातीरास जाऊन तेथून पंढरीस जाणार व तेथून पुण्यास अथवा टोक्यास गंगास्नानास जाण्याचा संभव, ३० जिल्हेज/इ. स. १७९९-१८०० (१५२६०).

याद्या:

पोतनिसी दप्तराकडील कारकुनांची, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (१५२१८-१५२१९); बापूजी गणेश गोखले यांजकडील सावकारास द्यावयाच्या ऐवजाची, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (१५२४६); त्रिंबक सदाशिव पुरंदरे यांचे तैनातेत हिवरे गांव नेमला त्यासंबंधी व इतर

**याद्या : चालू—**

नेमणुकांच्या वादासंबंधी (१५२४७); मोकासा वसुलीसंबंधी (१५२४८-१५२४९); बहादूरपुरा, प्रांत गुजराथ येथील मामलत राघो रामचंद्र याजकडून दूर करुन त्रिंबकजी डेंगळे यांजकडे सांगितली त्याबाबतच्या सनदापत्रांची, ५ साबान, सु. १२०८/८ ऑक्टो. १८०७ (१५२५०); बापू गणेश गोखले यांजकडील कर्जाची, सु. १२२४/इ. स. १८२३-२४ (१५२६२); वेतने सालवार न पावल्यामुळे कर्ज काढणाऱ्या कारकुनांची, सु. ११९८/इ. स. १७९७-९८ (१५२६५); मखलाशांचे हिशेब खाजगीत लागू झाले त्याबाबत (१५२६७); (१५२६८); (१५२६९).

---

## पुडके क्रमांक ३

का. सं. ५१ (१५२७१–१५३२१), सु. स. ११६८–१२१९, इ. स. १७६७–१८१९.

**पत्रे :**

**आबा*—काका*** : गंगा, पैठण इत्यादि मुक्काम करुन श्रीमंतांचे पुणे येथे आगमन, १५ मोहरम (१५३१८).

**खुरषदजी शेट मोदी—सदाशिवपंतभाऊ** : सोडचिठ्या घेऊन कारकुनास त्वरित रवाना करण्याबाबत, २९ मोहरम, सु. १२१३/२ फेब्रु. १८१३ (१५३२१).

**गोपाळ हरी—कृष्णराव** : घराकडील वृत्तांत सविस्तर निवेदन करुन आर्थिक अडचणीचे निवारण करण्याबाबत, ७ मोहरम (१५२७५).

**परशराम श्रीनिवास प्रतिनिधि—दौलतराव हैबतराव घाटगे** : खडर्याच्या लढाईत पराक्रम केल्याबद्दल पुसेगांव इनाम, १२ र. वल, सु. १२०१/१४ ऑगस्ट १८०० (१५२९४); **—गणेश काशी** : भरणा, ऐवजवसुली, निशापट्टी वगैरेबाबत, (१५३०९).

**बाजीराव रघुनाथ—कारकून दिमत शिवराम हरि**: तालुके झांशी येथील फडणिशी व मजमू दरकदाराकडून रद्द करुन सरकारात घेतल्याबाबत, २५ ज. खर, सु. १२१५/१४ जून १८१४ (१५२९५); **—मोरो अनंत, कमाविसदार आटेगांव**: साष्टी व मुंबई येथील गोविक्रीबंदीवर अनंत अणजूरकर याची नेमणूक, १५ मोहरम, सु. ११९९/३० जून १७९८ (१५२९६); **—हवालदार, सरनोबत व सरदार किल्ले कावनई**: आबाजी दादाजी याजकडे कावनई येथील मामलत दिल्याबाबत, २ साबान, सु. १२०४/१७ नोव्हे. १८०३ (१५२९७); **—मोरो काशिनाथ**: परगणे बलवाड येथील मामलत करण्याबाबत, १७ साबान, सु. १२०२/२४ डिसे. १८०१ (१५३०४); **—देशमुख, देशपांडे, परगणे हवेली विजापूर, खानापूर**: त्रिंबकजी डेंगळे यास परगणे विजापूर व खानापूर येथील कमाविशी दिल्याबाबत, १२ साबान, सु. १२१३/२० ऑगस्ट १८१२ (१५३०६-१५३०७); **—त्रिंबकजी डेंगळे**: यशवंत सखाराम याजकडील सरंजामी महालांच्या जप्तीची कमाविशी करण्याबाबत, २२ रजब, सु. १२०८/१५ सप्टें. १८०७ (१५३०८); **—राणा मोहनसिंग**: बडवाणी संस्थानचे आसपास मल्हारराव होळकर यांचे बंड (१५३१९).

**बापूजी सखाराम—विनायक आबा मराठे**: अरब वगैरे कडव्या लोकांची पायदळात भरती, इंग्रजांकडील खबर, डाकेच्या चौक्या काढून टाकणे वगैरेसंबंधी, ६ मोहरम, समान (१५३००).

**बापूजी गणेश—बाळाजीपंत** : सदाशिवपंतभाऊ यांचेशी कारभारविषयक बोलणी, नवलगुंद व गदग येथील बेरीज कबूल करणे व वासोटे येथील मसलतीबद्दल त्वरा करणे वगैरेबाबत, १० रजब (१५३२०).

**माधवराव कृष्ण—नारो गोविंद** : लालबागेची कमाविशी त्रिंबकजी डेंगळे यांस दिल्याबाबत, २५ रजब, सु. १२०८/२८ सप्टें. १८०७ (१५३११).

**लक्ष्मीबाई शिंदे—नारोपंत चक्रदेव**: अमृतराव शिंदे यांचे कर्ज निवारण करुन त्यास तैनात देण्याबाबत व कर्ज निवारणार्थ जासूद पाठविला म्हणून कानउघडणी, २७ र. वल, सु. ११९९/९ सप्टें. १७९८ (१५२८३).

**विनायक वासुदेव मराठे—वामनरावतात्या**: सुदर्शन तोफ परत आणली, फौज पुणतांबे येथे रवाना करणे, अब्दुल हमीद याच्या लोकांस फाटा दिला वगैरेबाबत, ११ र. वल, सु. १२१५/२१ फेब्रु. १८१५ (१५३१२).

**व्यंकटराम शेडुबीकर—मृत्युंजयभट कर्लेकर** : घाशीराम कोतवालाने जप्त केलेली देवतार्चने परत मिळाल्याबाबत, चैत्र शु. ५, श. १७१५/१७ मार्च १७९३ (१५३०२).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २८, पुडके क्रमांक ३—चालू

**पत्रे :** चालू—

**सखारामबापू सर्जेराव—बाळाजी कुंजीर :** नीळकंठरावआबा पुरंदरे यांच्या गावावरील रोखे उठवून त्यास उपद्रव न देण्याबाबत, ४ सवाल/इ. स. १८१६-१८१७ (**१५२७८**).

(**फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं**)

**आप्पाजी राम सहस्त्रबुद्धे**—(—): दिवटी व नेमणुकेच्या ऐवजाचा तपशील, १० र. खर, सु. १२१५/२० फेब्रु. १८१५ (**१५२८९**).

**आबाजी महादेव**—(—): इंग्रजांकडील लष्कर बल्लारी येथे आले व रोजमुरा वांटणारा कारकून बागलकोट येथे गेल्याबाबत, २९ ज. खर, खमस/इ. स. १८१४-१८१५ (**१५३१६**).

**काशी विश्वनाथ वैशंपायन**—(—): सिंहगड येथील रोजमुरे बेगमी, डागडुजी, कारखानदारी, वसुली, जमाखर्च वगैरेबाबत, २५ ज. वल (**१५२८४-१५२८५**); आप्पाजी पायगुडे याजकडील येणे ऐवज, सिंहगडावरील डोणजे दरवाज्यानजीक कारखान्याची परवानगी, राजाराम महाराज यांच्या नवमी उत्सवाबाबतची-खर्च यादी वगैरेबाबत, ३ ज. वल, सु. १२१५/१४ एप्रिल १८१५ (**१५२८६-१५२८७**); देवजी रामोशी यास बंदोबस्ताने रवाना केल्याबाबत, २४ जिलकाद, सु. १२१५/६ नोव्हे. १८१४ (**१५३१५**).

**खंडो धोंडदेव**—(—): वाड्यांत चाकरीस येणाऱ्या शिलेदारांना दिल्ली दरवाज्यांवर येण्यास मनाई करण्याबाबत, (**१५३१३**).

**गणेश श्रीपत**—(—): सरकारआज्ञेशिवाय मामलेदारांना मसाला न करण्याची ताकीद, १ सफर, सु. १२१४/२३ जाने. १८१४ (**१५३१४**).

**चिंतो वामन**—(—): आज्ञेप्रमाणे त्रिंबकजी डेंगळे यांजकडे खाजगीकडे भरण्यासाठीं ऐवज दिल्याबाबत, २४ सवाल/इ. स. १८०७-१८१० (**१५३०१**).

**नारो विष्णु**—(—): कोपरगांवाकडे कूच, ऐवजव्यवस्था करण्याची विनंती, ८ मोहरम (**१५२७२**).

**नारो विश्वनाथ**—(—): गुजराथमधील आवर्षण, जाफराबादनजीक चाच्यांशी झालेली लढाई, दौलतसिंग याचे जंबूसर येथे आगमन, गायकवाड, कोळी वगैरेंचा उपद्रव, डभई परगण्यांतील दंग्याचा बंदोबस्त वगैरे, २३ र. खर, सु. ११९५/१७ नोव्हें. १७९४ (**१५२९१**).

**मारुती मल्हार कुलकर्णी**—(—): हिंगणगावकर यांच्या अटकेतून प्रेषकाची सुटका करण्याविषयी विनंती, (**१५२९०**).

(**फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं**)

**(—)—कमाविसदार, वैजापूर :** वैजापूर येथील वतनावरील जहागिरी, शराकती वगैरे हक्काबद्दलची जमाबंदी हक्कदारांस देण्याची ताकीद (**१५२७९**).

**(—)—काका*** : सौ. चिमाबाई हिच्या शरीरप्रकृतिसंबंधी चौकशी (**१५३१७**).

**(—)—मोरो गंगाधर :** फुटगांवांच्या कमाविशीपैकी ४०० रु. सरकारांत भरणा करण्याबाबत, ४ जिल्हेज, सु. १२०४/१७ मार्च १८०४ (**१५२८८**).

**(—)—सदाशिव अभ्यंकर:** फौजेच्या फडणिशीवर गंगाधर मोरेश्वर याची नेमणूक, १५ ज. खर, सु. १२१४/४ जून १८१४ (**१५३०५**).

**(—)—हवालदार, किल्ले दुर्गाडी :** कल्याण व भिवंडी येथील मामलतीवर विठ्ठल नारायण याची नेमणूक, २४ साबान, सु. १२०३/२० डिसे. १८०२ (**१५२९३**).

(**प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं**)

काम लवकर आटपण्याबाबत (**१५२७३**); बालकराम सुकलाल याजकडील देणेघेणे, मीर-बहाद्दर याने केलेले आरोप, ऐवजाच्या निकडीबद्दल कीट साहेबांचे पत्र, इतर देणेघेणे वगैरेबाबत, मार्ग. शु. १५/इ. स. १७६९–७१ (**१५२७६-१५२७७**); भिल्लांचा उपद्रव, सरंजामाची तरतूद करण्याची विनंती, कार्तिक शु. ८ (**१५२८०**); कार्य सिद्धिस नेण्याची विनंती, (**१५२८१**); व्यंकटराव नारायण व कृष्णराव यांची श्रीमंताबरोबर सरदारकी करण्याबाबत बोलणी, (**१५२८२**); मेडत येथे यशवंतराव होळकर याने पेशव्यांच्या फौजेशी युद्ध केले त्याबाबत इ. स. १८०२ (**१५२९८**); मोगलाई सुभ्यापैकी महाल, तालुके व फुटगांव यांच्या वहिवाटी मामलेदार यांजकडून यावयाच्या त्यांचा तपशील, सु. १२१९/इ. स. १८१८-१८१९ (**१५३०३**).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २८, पुडके क्रमांक ३—चालू

**याद्या :**

गुजराथ येथील मजमू केशव महादेव फडके याजकडे होती ती त्याचे पत्नीस करार करुन देण्याबाबत (१५२७४); लष्करांच्या वरातांची, सु. ११८६/इ. स. १७८५-८६ (१५२९२).

**वरात :**

पुण्यांतील मुठा नदीवरील लकडीपुलाच्या दुरुस्ती खर्चाकरिता गोविंद महादेव याजवर, १० साबान, भाद्र. (१५३१०).

**हिशेब :**

रुपराम चौधरी याजकडील तालुके त्रिंबकबद्दल बनाजी बाबाजी मार्फत पुण्यास द्यावयाच्या बाकीचा माहेवार, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (१५२७१); केशव बहिरव व गोविंदराव सदाशिव यांजकडे दिलेल्या गावांच्या जमाखर्चाचा, सु. ११६८/इ. स. १७६७-६८ (१५२९९).

---

### पुडके क्रमांक ४

का. सं. ७९ (१५३२२–१५४००), सु. स. ११६१–१२१९, इ. स. १७६०–१८१८.

**जाहीरनामा :**

बाजीराव रघुनाथ प्रधानांकडील फौजेने मुलुखांत एकत्र न राहण्याबाबत कंपनी सरकारचा, ४ रजब, सु. १२१८/१० मे १८१८ (१५३७२).

**पत्रें :**

**आप्पाजीराव दळवी—नाना*** : बळवंतराव आप्पाजी याच्या गैरव्यवस्थेमुळे मंगलगडच्या लोकांचे हाल, बहिरजी नाईक पवार याचा सरनोबती ऐवज गैरआदा, मल्हार बल्लाळची सबनिशी दूर, किल्यास दारुची व कोठीची कमतरता, २८ सवाल, सु. ११८७/२३ ऑगस्ट १७८६ (१५३८०).

**कृष्णराव खटावकर—हरिपंत**: शिंदे याजकडील पठाणांनी खंडण्या घेतल्या व गांवे लुटली त्याचा तपशील, ७ जिलकाद (१५३९२).

**कृष्णाजी गंगाधर—बाबासाहेब***: चिकुर्डी येथील सखाराम व आप्पाजी देसाई यांचे वतनसंबंधात वडील धाकटेपणाचे कजियाबाबत पंचांचा निर्णय कळविण्याचे आश्वासन, मार्ग. शु. २ (१५३६०).

**कृष्णाजी गंगाधर पेंढारकर—बाबासाहेब***: संक्रमणाचा तिळगुळ रवाना, २० मोहरम, सु. १२१४/१३ जाने. १८१४ (१५३६९); ठाणे बत्तीसशिराळे येथील शिबंदीस दिलेल्या रोजमुरापटाची रवानगी, २ जिल्हेज, सु. १२१४/२६ नोव्हें. १८१३ (१५३७०).

**केशव बल्लाळ आगाशे—सखोपंतदादा गोडबोले** : कापडाचे रुपये आप्पाजीपंत दात्ये यांस देण्याबद्दल, आषाढ शु. १० (१५३८२).

**गोविंदराव गायकवाड—पंत प्रधान** (बाजीराव रघुनाथ): संरक्षण करण्याची मागणी, ६ रमजान, सु. ११९७/६ मार्च १७९७ (१५३५६); पेशवाईपद प्राप्त झाल्याचा आनंद व्यक्त व त्याचे श्रेय बाळाजीपंतनाना यास असल्याचे, ५ रजब, सु. ११९७/४ जाने. १७९७ (१५३५८).

**चिमणाजी नारायण—वामनरावतात्या** : कोळ्यांस दागिन्यांचे रुजुवातीकरितां पाठवून देण्याविषयी, कोळी व तांडेल यांचा कलह, ११ रजब, सु. १२१७/२८ मे १८१७ (१५३६६).

**जनार्दन नारायण देशपांडे—त्रिंबकजी पाटील डेंगळे** : आदरयुक्त पत्रोत्तर, ७ ज. खर (१५३९४).

**नारायणराव व्यंकटेश—भगवंतराव**: निमपैया देसाई याजकडून मौजे लोखंडी येथील काम करुन घेण्याबद्दल व डंबळकरांचा उपद्रव लागू न देण्याविषयी, ७ र. वल, सु. ११६१/१७ ऑक्टो. १७६० (१५३६१).

**नारो बल्लाळ रानडे—चिंतोपंतरावजी देशमुख** : मानसिंगराव पाटणकर फोंड सावंताच्या बंदोबस्तास खारेपाटण येथे रवाना झाले त्याचा तपशील, ४ सफर, सु. १२१०/११ मार्च १८१० (१५३९५).

**नारो विष्णु आपटे—बाबासाहेब***: ताळुके सालसी ते रायगड व सह्याद्रि ते समुद्रापर्यंतचे बंदोबस्तासाठीं पंचमेल लोक दिल्यास चोराचिलटांचा उपद्रव होणार नसल्याची खात्री, मार्ग व. १०, श. १७३४/२९ डिसें. १८१२ (१५३९७).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

पत्रे : चालू—

**परशराम श्रीनिवास**—**माधवराव भागवत**: कर्यात येलापूर येथील मुशाहिऱ्याचा ऐवज दिल्यासंबंधी, २९ ज. वल, सु. १२१३/१० जून १८१२ (**१५३५३**).

**बाजीराव रघुनाथ**—**काशीराव हरि**: महंमद जमालुद्दीनखान नगरकर याजकडील परगणे नेवासे वगैरे महालांच्या सदाशिव माणकेश्वर याने केलेल्या जप्तीची मामलत करण्याबद्दल हुकूम, ७ ज. खर, सु. १२०४/२४ सप्टें. १८०३ (**१५३२२**); —**आनंदराव धुळप**: आंबलेगड येथील फडणिशी बाजी संभाजी याजकडून दूर करुन महादजी वासुदेव याची नेमणूक व सालीना तैनातीची व्यवस्था, २७ ज. वल, सु. १२०३/२५ सप्टें. १८०२ (**१५३२३**); —**महिमतगड येथील हवालदार व कारकून**: महिमतगड येथील मामलत आप्पाजी शिंदे याजपासून दूर करुन मनोहरगीर यांची नेमणूक, ११ र. वल, सु. १२०४/१ जुलै १८०३ (**१५३२४**); —**त्रिंबकजी डेंगळे**: विठोजी कोलते याजकडील परगणे निंबाईत, मालेगांव ठाणे व मलगांव येथील दूर केलेली मामलत करण्याबद्दल, २ रजब, सु. १२१२/२३ जुलै १८११ (**१५३२५**); सोनोरी किल्याचा बंदोबस्त करण्यासाठीं नेमणूक, २० रजब, सु. १२०८/२३ सप्ट. १८०७ (**१५३२८**); —**डभईचे देशमुख, देशपांडे**: डभई परगण्याची मामलत बाळोजी कुंजीर याजकडून दूर करुन गोपाळ काशीकडे दिल्यामुळे डभई परगण्याचा अंमल त्याजकडे सुरळीत देण्याविषयी, ७ रजब, सु. १२१२/२८ जुलै १८११ (**१५३२६**); —**पिंपळनेर येथील कमाविसदार आप्पाजी राम**: बागलाण प्रांताच्या सरसुभेदारीवर बाळाजी रघुनाथ याची नेमणूक व परागंदा झालेल्या रयतेचा बंदोबस्त याबद्दल, १७ साबान, सु. १२१२/६ सप्टें. १८११ (**१५३२७**); —**विठोजी गायकवाड**: पुणे शहराची कमाविशी करण्याबद्दल, २५ जिलकाद, सु. १२०१/१० एप्रिल १८०१ (**१५३२९**); —**शंकराजी नरसी**: किल्ले सोंडूर येथील महालाचे बंदोबस्तावर यशवंतराव घोरपडे यांची नेमणूक, ८ जिलकाद, सु. ११९९/१४ एप्रिल १७९९ (**१५३३०**); —**आबाजी महादेव**: सिरसगांव येथील स्वराज्य अंमलाची कमाविशी पांडुरंग विठ्ठल याजकडे दिल्यामुळे तो अंमल त्याचे स्वाधीन करण्याबाबत, ३ साबान, सु. १२०२/१० डिसें. १८०१ (**१५३३१**); —**लक्ष्मण बल्लाळ**: परगणे केरूर येथील कमाविशीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याबाबत, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३२**); —**बापूजी शिवराम फडणीस**: परगणे केरुर येथील जमाबंदी, जमीनझाडे व शिबंदीची कबजे घेऊन हुजूर येणे व नरेंद्रसिंग मलसिंग यांस मसाला देण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३३**); —**आत्माराम नारायण**: परगणे केरुर येथील हिशेबाचे कागदपत्र घेऊन हुजूर येण्याविषयी, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३४-१५३३५**); —**चिंतो सखदेव मजमदार**: परगणे मुळगुंद येथील हिशेबी कागदपत्र घेऊन हुजूर येणे व लछीराम मयाराम यास मसाला देण्याबाबत, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३६**); —**काळो गोविंद**: बडणी येथील कमाविशीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याविषयी, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३७**); —**धोंडो केशव**: नवी हुबळी येथील कमाविशीचे हिशेबाचे कागदपत्र घेऊन हुजूर येणे व लछीराम मयाराम यास मसाला देण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३८**); —**सदाशिव भास्कर**: परगणे मुळगुंद येथील कमाविशीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याविषयी, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३३९**); —**श्रीपतराव मोरेश्वर फडणीस**: मुळगुंद येथील हिशेब घेऊन हुजूर येण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३४०**); —**बाबुराव गोमाजी दप्तरदार**: परगणे मुळगुंद येथील हिशेब घेऊन हुजूर येण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३४१**); —**सदाशिव शंकर फडणीस**: परगणे खानापूर येथील हिशेब त्वरित पाठविण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३४२**); —**आनंदराव रामचंद्र**: तालुका सावनूरमधील मोरबा वगैरे गावांचे मामलतीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याबद्दल, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४३**); —**येसाजी गोविंद**: परगणे कोड येथील मामलतीचा हिशेब घेऊन हुजूर येणे म्हणून, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४४**); —**आप्पाजी गोविंद**: परगणे सिगांव येथील मामलतीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याबद्दल, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४५**); —**रघुनाथ भास्कर**: सावनूर येथील मामलतीचा हिशेब घेऊन हुजूर बोलावणे, १९ ज. खर, सु. ११९७/१९ डिसें. १७९६ (**१५३४६**); —**त्रिंबकराव बल्लाळ**: हनगल परगण्यांतील मामलतीचा हिशेब पाठविण्याबद्दल, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४७**); —**सुबराव अनंत**: कारडगी परगण्याचा हिशेब घेऊन येण्याबद्दल, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४८**);

**पत्रे : चालू—**

—**देवराव अनंत** : परगणे रटेहली येथील मामलतीचा हिशेब पाठविण्यासंबंधी, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३४९**); —**रामचंद्र शिवाजी** : किल्ले सोलापूर येथील सबनिशी आबाजी बल्लाळ याजकडे देण्याबद्दल, ९ साबान, सु. ११९७/७ फेब्रु. १७९७ (**१५३५१**); —**पांडुरंग भास्कर** : परगणे कागनेला येथील मामलतीचे हिशेब घेऊन हुजूर येण्याबद्दल, १२ ज. खर, सु. ११९७/१२ डिसें. १७९६ (**१५३५२**); —**विनायक अमृतराव** : कोंकण येथील फडणिशी दिनकर गोविंद याजकडून दूर करून केशव विश्वनाथ याजकडे दिली असल्याबद्दल, १३ साबान, सु. ११९८/३१ जाने. १७९८ (**१५३५७**); —**बाजी आण्णाजी देशपांडे सेतवडेकर** : तोतयाकडे चाकरी केल्याचे गुन्हयाबाबत सरकारांत ऐवज भरणे, बळवंतराव थोरात याच्या रोजमुऱ्याचा ऐवज देण्याविषयी, ७ ज. वल, सु. ११९७/८ नोव्हें. १७९६ (**१५३५९**); —**सदाशिव रघुनाथ दप्तरदार** : कर्यात आण्णेगिरी येथील दप्तरदारीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याविषयी, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३६४**); —**मोरो सदाशिव** : कर्यात आण्णेगिरी येथील हिशेबासंबंधीची कागदपत्रे घेऊन हुजूर येण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३६७**); —**नारो कृष्ण** : सावनूर येथील फडणिशीचे हिशेबाचे कागदपत्र घेऊन हुजूर येण्याबद्दल, १९ रजब, सु. ११९७/१८ जाने. १७९७ (**१५३६८**); —**देशमुख, देशपांडे सावदेकर** : गंगाधर बाळकृष्ण यास सरकारी आज्ञेशिवाय मामलतीचा वसूल देऊ नये म्हणून, २ जिलकाद, सु. १२१७/२५ सप्टें. १८१६ (**१५३७५**); —**देशमुख, देशपांडे** : केळंजा किल्ल्याचे सरंजामी गांव व जमिनीचा वसूल तेथील आबादानी झाल्याखेरीज कचोराम याजकडे देऊ नये म्हणून, २७ रमजान, सु. १२१६/२ सप्टें. १८१५ (**१५३७७**); सौंदल येथील आबादी झाल्याखेरीज तेथील वसूल वामनाजी गोविंद यास देऊ नये म्हणून, २७ रमजान, सु. १२१६/२ सप्टें. १८१५ (**१५३७८**); —**देशमुख, देशपांडे देवगडकर** : सरकार आज्ञेखेरीज देवगडचा वसूल वामनाजी गोविंद यास देऊ नये म्हणून, २७ रमजान, सु. १२१६/२ सप्टें. १८१५ (**१५३७९**); —**बाळाजी गोविंद** : ज्यांस पालख्यांची नेमणूक आहे त्यांच्या भोयांनी सरकार तळ्यांतील गाळ काढण्याचा शिरस्ता असल्यामुळे बाळाजी गोविंद बुंदेलखंडाचे मामलेदार यांजकडून रोख ऐवज घेण्याबद्दल, २१ सफर, सु. १२१२/६ मार्च १८१२ (**१५३८१**); —**सदाशिव व केशव कृष्णाजी जगन्नाथ**: गोटणे देवाचे हा गांव भार्गवराम देवाकडे इनाम असून त्यास हुजूरून धावडसी व सुभ्याहून आसाम्या, इनाम व धर्मादाय करून दिले आहे तरी वसुलीचा तगादा करीत असतील त्यांना ताकीद देण्याबद्दल, ५ मोहरम, सु. ११९९/२० जून १७९८ (**१५३८४**); १५ मोहरम, सु. ११९९/३० जून १७९८ (**१५३८५**); —**भगवंतराव गायकवाड** : अहमदाबाद येथील रसदेच्या ऐवजाचा भरणा करारानुसार हप्तेबंदीने करण्याविषयी, २२ जिल्हेज, सु. १२०५/२४ मार्च १८०५ (**१५३८७**); —**काशीराव होळकर** : उमेदसिंगाचे मृत्युमुळे बडवाणी संस्थान मोहनसिंग याच्या नांवे करण्याबद्दल, राजे मोहनसिंग याच्या बडवाणी या संस्थानास होळकरांचा उपद्रव, ११ सवाल, सु. १२००/८ मार्च १८०० (**१५३८८-१५३८९**); —**खंडेराव | नीळकंठ** : मामले कोहोज येथील अवर्षणामुळे पिकांच्या चौकशीकरितां सरकारातून कारकून रवाना, १२ रजब, सु. १२०४/२९ ऑक्टो. १८०३ (**१५३९९**).

**महंमद बुऱ्हाणुद्दीखान पठाण नगरकर—कुसाजी डेंगळे** : तर्फ हवेली व देपूर येथील मोकासा, जकात वगैरे जहागिरीचे तीन गांव याची नीळकंठ मोरेश्वर याजकडून दूर केलेली कमाविशी करण्याबद्दल, २१ साबान, सु. १२०९/१२ ऑक्टो. १८०८ (**१५३९६**).

**माधवराव अनंत रास्ते—बापूजी गणेश**: बळवंतराव रास्ते एकनिष्ठपणे राहतील म्हणून जामीन राहात असल्याबाबत (**१५३५४**).

**वसईकडील सरदार—बाबासाहेब***: वसई किल्ल्यावर ऐवजाची तीव्र टंचाई झाल्यामुळे अर्थव्यवस्थेचा बंदोबस्त करण्याची विनंती (**१५३९८**).

**(फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं)**

**गणोबा—(—)**: कुंभारखाणी येथील कमाविशीस उपद्रव होत आहे त्याचा बंदोबस्त करण्याविषयी, ९ मोहरम, सु. १२१०/१४ फेब्रु. १८१० (**१५३६३**).

* मूळ नावांची निश्चिती नाही.

## दप्तर क्रमांक २८, पुडके क्रमांक ४—चालू

**पत्रे : चालू—**

**गोविंद चिमणाजी दिवेकर**—(—): जोरखे येथे पठाणांकडून होत असलेल्या उपद्रवाचा साद्यंत वृत्तांत, २५ सफर (१५३६२).

**बाजीराव रघुनाथ**—(—): प्रांत बागलाण येथील परगणे, महाल, गांव वगैरेंच्या अंमलाचा तपशील, सु. १२१४/इ. स. १८१३-१८१४ (१५३९१).

**यादव तुकदेव**—(—): आनंदराव भिकाजी याजकडील फौजेची तपासणी व त्यावर अभिप्राय (१५२७३).

**(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं)**

(—)—**आप्पाजी हरि** : गुजराची बायको केशरी सप्तश्रृंगीस जात असता नहावी येथील कोळ्यांनी तिच्या भावास मारून तिला पळविले तिचा शोध करण्याबाबत, २० सवाल, सु. ११६१/२६ मे १७६१ (१५३६५).

(—)—**कृष्णाजी बापूजी** : बाळाजी जनार्दन याजकडील परगणे गव्हे यातील गांवाचा ऐवज सरकारांत घेण्याविषयी, १७ ज. वल, सु. १२०२/२६ सप्टें. १८०१ (१५३८६).

(—)—**चिंतो वामन** : खाशाकडील खाजगी अंतःस्ताचा ऐवज करारानुसार रत्नागिरी येथून रवाना करण्याबाबत, २० ज. वल, सु. १२१२/१२ जून १८११ (१५३७६).

(—)—**त्रिंबक भवानी** : वंदनगड येथे गंगाधर लक्ष्मण या बंडवाल्यास किल्ल्यावर बंदोबस्ताने कैदेत ठेवण्याची सूचना, १६ ज. खर, सु. १२१४/१६ जून १८१३ (१५३५०).

(—)—**बाळाजी कृष्ण** : येणे असलेल्या रकमेपैकी गारदी यास ऐवज दिल्याबद्दल, २ साबान, सु. १२१०/१३ सप्टें. १८०९ (१५३९०).

(—)—**व्यंकटराव भास्कर नरगुंदकर** : सुबोधेंद्र स्वामींचे कुंभकोण येथील मठाचे खर्चास्तिव बेन्नूर हा गांव इनाम देण्याबद्दल, सु. १२०२-१२०४/इ. स. १८०१-१८०४ (१५३५५).

(—)—**संभाजी व मलोजी जाधव याजकडील कारकून** : संभाजी व मलोजी जाधव याजकडील सरंजामी ऐवजापैकी त्रिंबकजी डेंगळे वगैरे सरदारांचे जासूद व कारकुनांस ऐवज देण्याविषयी, ७ जिलकाद, सु. १२१५/२१ ऑक्टो. १८१४ (१५३९३).

(--)—**हरिपंत** : माधवराव रामचंद्र याजकडील पागेचे हिशेब घेऊन दप्तरी येण्याविषयी, इ. स. १७६८-६९ (१५३८३).

**(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं)**

लष्कराच्या तयारीबाबत माहिती (१५३७१); चतुर्थीनिमित्य श्रीमंतांचा खेडास मुक्काम व इतर किरकोळ माहिती (१५३७४); हिशेब येत नाहींत म्हणून फडणिसांचे घरी चौकी (१५४००).

---

## पुडके क्रमांक ५

का. सं. १०० (१५४०१-१५५००), सु. स. ११९२-१२१८, इ. स. १७९१-१८१७.

**आज्ञापत्रें :**

**पंत प्रधान** (बाजीराव रघुनाथ)—**परगणे चांदवडमधील रयत** : चांदवड परगण्यांतील पांच गांवांचा वसूल आज्ञेखेरीज विनायक धोंडदेव यास न देण्याबाबत, सु. १२१६/इ. स. १८१५-१६ (१५४३९); —**गोटणे देवाचे येथील कमाविसदार**: भार्गवराम देवाकडे गोटणे देवाचे हे गांव इनाम असून तेथील ब्राह्मणांना धावडसीहून व सुभ्याहून करून दिलेल्या आसाम्या, इनाम व धर्मादाय अंमलास वसुलाचा तगादा न करणें, ५ मोहरम, सु. ११९९/२० जून १७९८ (१५४७३); —**देशमुख, देशपांडे व मोकदम टोकडे** : त्रिंबकजी डेंगळे व त्याच्यासमवेतच्या लोकांस जिवंत अगर मृत धरून आणण्याबाबत आव्हान, ४ रजब, सु. १२१७/२१ मे १८१७ (१५४८५); —**मोकदम, सावरगांव** : सांवरगांव येथील मिरासपट्टीतील ऐवज नीळकंठ महादेव याला खर्चाकरितां देण्याबाबत (१५४८६); —**मोकदम आवेलकर**: जिवाजी यशवंत या बंडकऱ्यास मदत करणाऱ्या शिलेदार व येसाजी पाटील यांची मालमत्ता जप्त करण्याबाबत, ५ सवाल, सु. १२०२/९ फेब्रु. १८०२ (१५४८७); —**कमाविसदार राजापूरकर** : उन्हाळ्यांत दुकाने घालणाऱ्या वाण्याकडून वसूल करावयाचे ऐवजाबाबत, ९ जिल्हेज, सु. १२०१/२४ एप्रिल १८०१ (१५४८८); —**मोकदम, हिंगोणे व विखरण** : साल मजकूरचा वसूल सरकार

**आज्ञापत्रे : चालू—**

आज्ञेशिवाय कमाविसदार आबाजी रघुनाथ यांस देऊ नये म्हणून, २१ जिलकाद, सु. १२१६/२५ ऑक्टो. १८१५ (१५४८९) ; **—रयत, एकसाल येथील** : एकसाल, प्रांत कल्याण येथील बाळाजी जनार्दन याजकडील खोती नारो रामचंद्र यांस सांगितल्याबद्दल, १२ र. खर, सु. १२०५/२० जुलै १८०४ (१५४९०) ; **—घोटवडयाची रयत** : घोटवडे येथील बाळाजी जनार्दन याजकडील खोती भास्कर नारायण यांजकडे सांगितल्याबद्दल, १० जिल्हेज, सु. १२०५/१२ मार्च १८०५ (१५४९१) ; **—रयत, मौजे आर्डे** : आर्डे, प्रांत कल्याण येथील खोती बाळाजी जनार्दन याजकडून काढून नारो रामचंद्र यांस दिल्याबद्दल, १२ र. खर, सु. १२०५/२० जुलै १८०४ (१५४९२) ; **—मौजे जिते येथील रयत** : जिते, प्रांत कल्याण येथील खोती बाळाजी जनार्दन याजकडून काढून नारो रामचंद्र याला दिल्याबद्दल, १२ र. खर, सु. १२०५/२० जुलै १८०४ (१५४९३) ; **—मोकदम, मौजे खुजारे, प्रांत राजपुरी** : खुजारे हा देशमुखाकडील इनाम गांव आप्पाजी याजकडे कमाविशीस होता तो दूर करून दुसऱ्यास दिल्याबद्दल, सु. १२०४/इ. स. १८०३-१८०४ (१५४९४) ; **—मोकदम, मौजेसोहाळे** : सोहाळे येथील जप्तीची कमाविशी बापूजी गणेश गोखले याजकडून दूर करून दुसऱ्यास दिली त्याबाबत, २७ ज. वल, सु. १२१३/२९ मे १८१३ (१५४९५) ; **—मोकदम, मौजे वडाळे** : वडाळे येथील तिजाई अंमलावर गोपाळराव त्रिंबक रास्त यांची नेमणूक, सु. ११९८/ इ. स. १७९७-९८ (१५४९६) ; **—मोकदम, मौजे भोईटे** : गणपतराव विश्वनाथ याजकडील भोईटे येथील अंमलावर त्रिंबकजी डेंगळे यांची नेमणूक, २० रजब, सु. १२०८/२३ सप्टें. १८०७ (१५४९७).

**कौल :**

**हेन्री पॉटिंजर, कलेक्टर अहमदनगर—भिकाजी बाबाजी वाघ** : बाजीराव याजकडे चाकरीस असलेल्या प्रापकास बंधूसुद्धा आपल्या घरी आबाद राहण्याबाबत, २९ जून १८१८ (१५४१४).

**पत्रे :**

**आप्पाजी राम आगाशे—जनार्दनपंतभाऊ आगाशे** : सासवड येथे वेदशाळा बांधण्यास बाळकृष्णभट पुराणिक यांस पैसे देण्याबाबत, २४ सफर, सु. १२१६/२५ जाने. १८१६ (१५४३६).

**आनंदराव शिवराम—बापूजीपंतदादा** : स्वामींचे दर्शनास विशाळगडास गमन व तेथून आगमन, २४ र. वल, सु. १२१६/२३ फेब्रु. १८१६ (१५४३८).

**कादर भालदार—आप्पाजीपंत आप्पा आगाशे** : ठाणे कोपरली येथे चोहोकडून वेढा, किल्ले मालेगांव येथील दारुगोळा आल्यावर काम फत्ते होईल म्हणून (१५४४६).]

**कृष्णराव नारायण—पंत प्रधान** (बाजीराव रघुनाथ): भिवराव जनार्दन देशपांडे यांजकडील औंध गांवावर राजाराम खंडेराव यांनी लोक पाठवून तसनस केली त्याची चौकशी करण्याबद्दल (१५४०६).

**कृष्णराव बापूजी—भीमराव** : बाळाजी जनार्दन फडणीस यास भोसे येथील रानांतील गवत नेण्यास परवानगी, (१५४६४) ; **—आत्मारामममा** : वाळंबे येथील ठाण्याचा बंदोबस्त बापूसाहेबांचे मदतीने राखावा व गंगाधर लक्ष्मण जोशी यांस जाबसालाबाबत विचारणा करावी (१५४६९).

**कृष्णाजी गंगाधर पेंढारकर—बाबासाहेब*** : बत्तीसशिराळे येथील शिबंदीच्या याद्या पाठविण्याबाबत, १२ रजब, सु. १२१४/११ जुलै १८१३ (१५४०८) ; बत्तीसशिराळे येथील ठाण्याच्या दुरुस्तीशिवाय गांवाकडून वेठबिगार घेतल्याची मामलेदाराची खोटी तक्रार, १८ मोहरम, सु. १२१४/११ जाने. १८१४ (१५४२४).

**गणपतराव विश्वनाथ—नारो भिवराव** : कोपरगांव येथून सुदर्शन तोफ घेऊन सरंजामसुद्धा पुण्यास येण्याबद्दल, २१ सफर, सु. १२१५/२ फेब्रु. १८१५ (१५४५०).

**गोविंदराव गोडबोले—नारायणमामा** : विनायकराव व जानकीबाई यांची आनंदवली येथील खर्चाची तरतूद, २२ साबान (१५४५८).

**चिंतो वामन देशमुख—विनायक देशमुख** : गुहागर येथील सरकारी वाड्यासंबंधी (अपूर्ण) (१५४७८).

**छित्रसिंगराव टोके—राघोपंतदादा** : श्रीमंत, चिंतोपंत, खंडेराव वैजनाथ भट वगैरे मुत्सद्यांची पत्रें त्यांची त्यांना पोहोचविणे, ४ साबान, सु. १२०४/१९ नोव्हें. १८०३ (१५४३०) ; **—चिंतोपंतरावजी देशमुख** : हुजूरकडे किंवा संस्थानाकडे चाकरी करण्याची इच्छा (१५४३३).

---

* मूळ नावांची निश्चिती नाही.

**किरकोळ :** चालू—

तरतुदीसंबंधी उपयुक्त सूचना, १७ जुलै १८२३ (**१६९**); ब्रीकचा स्वभाव विशेष, ६ सप्टें. १८२३ (**१९८**); होनवाड येथील कमाविसदारांचा निगडी खुर्द येथील दंगा, २५ सप्टें. १८२३ (**२०७**).

**खाजगी :** दत्तक प्रकरण चौकशी, २३-२४ नोव्हें. १८२२ (**१८**); पटवर्धन व महाराज, यांच्यामधील शिवेचा कजिया, महाराजांनी इंग्रजीत पाठविलेल्या हिंशेबास मॉरीसची पसंती, १९ डिसें. १८२२ (**३९**); वाई पेटचांतील लोकांनी फलटणला केलेले स्थलांतराविषयी चौकशी करण्याबाबत मॉरीसची सूचना, २१ डिसें. १८२२ (**४०**); पेटा वाळवे येथील पंचाचे बडतर्फी प्रकरण, २८ जाने. १८२३ (**६५**); एकमेकांतील संबंधाबाबत ब्रीक, आप्पासाहेब व महाराज यांची बोलणी, १४ मार्च १८२३ (**९४-९५**); रघुजी भोसले यांच्या मुलीचे भेटीबाबतचे पत्र, ३ एप्रिल १८२३ (**१०७**); साळुबाई मोहिते व ब्रीक यांची भेट, ४ एप्रिल १८२३ (**१०८**); भोसले यांजकडील लग्नसंबंध व खर्च सरकारांतून करण्याबाबत, ८ मे १८२३ (**१२६**); एल्फिन्स्टन याजकडून ग्रीकच्या विद्यमाने महाराजांना बंदुक व पिस्तुल नजर, १७ जून १८२३ (**१५२**); वाळिंबे यांच्या कुरणास प्रतिनिधींचा उपद्रव लागू न देण्याबाबत, १ सप्टें. १८२३ (**१९३**); पटवर्धनांच्या शिवेच्या कजियाबाबत आदम याने मध्यस्थी करण्याची सूचना, ८ सप्टें. १८२३ (**१९९**); जानराव नाईक निंबाळकरांचा स्वतःस कर्ज नसल्याचा निवाळा, २० सप्टें. १८२३ (**२०४**); गोविंदराव पटवर्धन (मिरजकर) यांचे मुलाचा अपघाती मृत्यू, १ ऑक्टोबर १८२३ (**२१०**).

**छत्रपती व रेसिडेंट :** एल्फिन्स्टन व महाराज यांची कशी भेट व्हावी याबाबत ग्रँट, मॉरीस व बाळाजीपंत नातू वगैरेंची बोलणी, ११ नोव्हें. १८२२ (**८**); जहागिरदारांच्या तक्रारी व त्यावर ग्रँटची उत्तरे महाराजांचा फायदाच करीत असल्याचा ग्रँटचा विठोबा याच्यापाशी दावा, गव्हर्नरांची महाराजांवर खुशी, आदम याच्याकडे सारा व्यवहार सोपविल्याबाबत ग्रँटचे बोलणे, २०, २१ नोव्हें. १८२२ (**१२-१३**); महाराजांकडे डॉक्टर ठेवण्याविषयी बोलणी, २८ डिसें. १८२२ (**४४-४५**); महाराजांनी कनिष्ठ लोकांशी योग्य ते अंतर राखूनच बोलण्याची सूचना, पळालेल्या बंदिवान लोकांस पूर्वीप्रमाणे फाशी न देण्याबाबत, १८ एप्रिल १८२३ (**११६**).

**छत्रपतीचा नित्याचा कार्यक्रम :** (खालील पृष्ठांची २५ ऑक्टो. १८२२ ते ४ आक्टो. १८२३ अशी तारीख आहे.)

**चालीरीती :** ७५, ७८, १२४, १३६.

**धार्मिक :** १०४.

**नित्यनेम :** ६, २५, ६२, ७३, ७९, ९२, ९६, १४२, १४९, १५९, १६६, १७६, १७८, १९२, २०२, २०३, २०९.

**न्याय :** ६१, १६२, १६५, १७५, १९०, १९१, २०८.

**यादी :** २३, १६८.

**राजकारण :** २४, ४६, ९३, ११२, २११.

**राज्यकारभार :** ३३, ६०, ६७, ७६, ८१, ९१, ११४, १४६, १४८, १५३, १६१, १७९, १८८, १९१, १९७.

**हिशेब :** १३७, १४४, १८०.

**जहागिरविषयक :** डफळे यांचे जहागिरीचा निवाडा, २ डिसें. १८२२ (**२७**); दाजीबा डफळे याच्या दौलतीस वारस ठरवण्यासंबंधीच्या शर्ती व त्यावर मॉरीसची उत्तरे, १५ जानेवारी १८२३ (**५८**); जहागिरीच्या जप्तीबाबत सरकारकडून (मॉरीसकडून) एकवाक्यतेची अपेक्षा, २४ जाने. १८२३ (**६३**); अक्कलकोटकर यांचे गांव जप्त करण्याबाबत मॉरीसच्या सूचना, ६ फेब्रु. १८२३ (**७१**); पटवर्धनांना बेणापूर हे गांव देण्यासंबंधी, २ मार्च १८२३ (**८२**); वाई



जहागिर

धार्मिक :

राजकीय :

राज्यकारभार

**जहागिरविषयक** : चालू—

पेट्यातील जमाखर्च, जहागिरदारीचे खटले, जमाबंदी, शिकारीची तयारी, पटवर्धनांना द्यावयाची गांवे, एल्फिन्स्टन याचे ब्रीक यास पत्र वगैरेसंबंधीची कलमे, ८ मार्च १८२३ (८६–९०) ; कृष्णाबाई सुमंत व महादाजीपंत, दाजीबा डफळे व साळूबाई यांच्यांतील खटल्यासंबंधी, २२ मार्च १८२३ (९८) ; अक्कलकोटकरांच्या गांवासंबंधी निर्णय, पेन्शन देण्याची तारीख, २४ मार्च १८२३ (१००–१०३) ; संक्राजी घोरपडे बेलगीकर यांचे दत्तक प्रकरण, ११ जून १८२३ (१४७) ; सरंजामी सरदारांचे पेन्शन, सरंजाम असून इनाम गाव आहे अशा प्रकरणांवर चर्चा, १७ जून १८२३ (१५०) ; सुरली गावावरील रोखा प्रकरण, अक्कलकोटकर, निपाणीकर वाद, साळुबाइ डफळे यांच्या बाबती अंमल वगैरे कलमावर ब्रीक व विठोबा यांची चर्चा, २ सप्टेंबर १८२३ (१९४–१९६).

**धार्मिक** :

प्रतापगडावरील देवीचे दर्शन व तेथील व्यवस्थेबाबत चौकशी, २६ एप्रिल १८२३ (११९) ; चाफळ मुक्कामी स्वामींची मुंज, १२ मे १८२३ (१२८) ; त्रिवेगडाचार्य शास्त्री यांनी लिहिलेल्या ग्रंथाची रॉबिन्सनकडून प्रशस्ती, २१ मे १८२३ (१३५) ; पाद्री (ख्रिस्तांचा गुरू) महाराजास भेटावयास येणार असल्याची बातमी, ३१ जुलै १८२३ (१७७) ; श्रावणी सोमवारनिमित्त कचेऱ्यांस ४ वाजता सुटी, ११ ऑगस्ट १८२३ (१८१) ; नवरात्र उत्सवासंबंधी विवेचन, ५ ऑक्टो. १८२३ (२१२-२१३).

**राजकीय** :

दसऱ्यास भेटीला न आल्यामुळे ग्रँट याचा फत्तेसिंग भोसले यांजवर राग, एल्फिन्स्टन व फत्तेसिंग यांची भेट कशी व्हावी या बाबतची कलमे, २५ ऑक्टोबर १८२२ ते २६ ऑक्टोबर १८२२ (१–३) ; मॉरीस व महाराज यांची ६ नोव्हेंबर रोजी वाठार मुक्कामी होणाऱ्या भेटीची योजना, २८ ऑक्टोबर १८२२ (५) ; अक्कलकोटकर यांचा मॉरीससह वीर येथे जाण्याचा बेत, ७ नोव्हेंबर १८२२ (७) ; प्रतापगडचा किल्ला गव्हर्नरांकडून महाराजांचे हवाली, महाराज व एल्फिन्स्टन यांचे सख्य, १५ नोव्हेंबर १८२२ (१०) ; एल्फिन्स्टन व महाराज यांचे सख्य आहे असे मिरजकर यांच्या कारकुनाचे म्हणणे, २० नोव्हें. १८२२ (११) ; खाजगी वाड्यातून लष्करच्या लोकांनी बिना परवाना रहावे काय याबाबत प्रश्नोत्तरे, १७ डिसेंबर १८२२ (३८) ; महाराजांचे वाड्यांत जाण्यास कर्नल यांची बंदी, स्वारीचे फलटण येथे आगमन व जानराव नाईक यांच्याकडे मुक्काम, २३ ते २६ डिसेंबर १८२२ (४१) ; अमृत काशिनाथ गाडगीळ यांचे गांव जप्त केल्याबाबत फत्तेसिंग भोसले यांचे पत्र, २ जानेवारी १८२३ (४९) ; महाराजांविषयीची वागणूक, त्यांच्या वहिवाटीची अडवणूक वगैरे प्रश्नावर विठोबा व मॉरीस यांच्यात चर्चा, ९ जानेवारी १८२३ (५४-५५) ; दाजीबा डफळे अक्कलकोटकर यांजबरोबर ठेवावयाची वर्तणूक, वाळवे व पेड्याच्या बंदोबस्ताबाबत सूचना, चिंतामणराव पटवर्धन यांचा शिवेचा कजिया, २८ जानेवारी १८२३ (६६) ; मिरजकरांकडील वाळवे येथील वहिवाटीबाबत, ४ फेब्रुवारी १८२३ (६८) ; अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले यांच्या गैरवागणुकीबाबत मॉरीस याची महाराजांकडे विचारणा, ५ फेब्रुवारी १८२३ (६९) ; मॉरीस याची कर्तव्य कठोरता, वॉर्डनची सूचना अमान्य, १४ फेब्रुवारी १८२३ (७४) ; माधवराव रास्ते व महाराज यांची मोतीबागेतील भेट, २९ एप्रिल १८२३ (१२१) ; बाळाजीपंत नातू प्रमाणेच बळवंतराव भोसले याजवर ब्रीक याची मेहरबानी, २५ जून १८२३ (१५६) ; इंग्रज वकीलाशी स्नेह ठेवण्याबाबत आदम याचा सल्ला, विठोबा दिवाण याचे ब्रीक यास सडेतोड उत्तर, ९, १० जुलै १८२३ (१६४) ; बळवंतराव यास चिटणीसी पद दण्याबाबत, १६ जुलै १८२३ (१६७) ; ब्रीक याचा महाराजाबरोबर पंढरपूरला जाण्यास नकार, एकमेकांच्या कारभारांत ढवळाढवळ न करण्याचा इंग्रजांचा रिवाज, २२ जुलै १८७२ (१७२–१७४).

**राज्यकारभार** :

साहेबांवर भरवसा, सर्वांशी समान वागणूक, महाराज व दिवाण यामधील संबंध, प्रतापगड वगैरे बाबत आदमशी ठरलेली कलमे, २१ नोव्हेंबर १८२२ (१४-१५) ; काशीपंत बेंद्रे याजवर बेभरवसा, रयतेचे हित करण्याकडे महाराजांचे लक्ष, १४ नोव्हेंबर १८२२ (१९) ; आण्णा डबीर व चिमणाजी (भोसले) यांचेकडे प्रतापगडचा हवाला, १३ डिसेंबर १८२२ (३५) ;

**राज्यकारभार : चालू—**

राज्यकारभार सुधारण्याबाबत मॉरीस याची सूचना, तैनातीप्रमाणे सुभेदार व मामलेदार यांजकडून चोख काम करून घेण्याची योजना, १६ डिसेंबर १८२२(३६) ; राज्यव्यहारासंबंधी मॉरीस याच्याशी झालेली चर्चा, ४ जानेवारी १८२३(५०) ; कोल्हापूरकर व एलिफन्स्टन यांची कोल्हापूरच्या सरहद्दीवर भेट, मॉरीस याच्याशी झालेली इतर बोलणी, ५ जानेवारी १८२३ (५१-५२); वॉर्डनची बडदास्त न ठेवल्याबाबत तारगावचे मामलेदारास कानपिचक्या, ६ ते ८ जानेवारी १८२३(५३) ; चोख बंदोबस्त ठेवण्याबाबत मामलेदारास मॉरीसची ताकीद, निपाणीकर मामलेदार याने ठेवावयाच्या बंदोबस्ताबाबत, १०-११ जानेवारी १८२३(५६) ; सरकारी व दिवाणी हुकूमांचा तपशील, ७ मार्च १८२३(८५) ; विठोबा व बळवंतराव चिटणीस यांना न अडविण्याबाबत ब्रीक याची पहारेकऱ्यास ताकीद, २३ मार्च १८२३ (९९); खर्चातील कपात, अक्कलकोटकर व वाठारकर यांजकडील कलमे, नाना फडणीस याजकडील गावांच्या वहिवाटीबाबत ब्रीकबरोबर झालेली चर्चा, ६ एप्रिल १८२३ (१०९-११०) ; एलिफन्स्टन, ब्रीक व त्याचे हाताखालील लोकांवर महाराजांचा विश्वास, १२ एप्रिल १८२३(११३) ; संत्री लोकांचा रयतेवरील जुलुम, महाराज व इंग्रज यांच्यातील दिलजमाई दर्शविणारा खाना, २१-२३ एप्रिल १८२३(११८); बंदिवानाशी केलेल्या गरवागणुकीबद्दल हवालदाराची बडतर्फी, १२ मे १८२३(१२८) ; मोगल रिसालदारासंबंधीची कडक वागणूक, ब्रीकचा समजूतदारपणा, १२ मे १८२३(१२९) ; ब्रीकची न्यायनिष्ठुरता, २४ मे १८२३(१३८) ; राज्यविषयक कामाबाबत ब्रीक याची महाराजांशी चर्चा, ७ जून १८२३(१४३) ; ब्रीक व आदम यांचे वैमनस्य, ८ जून १८२३(१४५) ; ब्रीक व विठोबा यांची कारभाराबाबत बोलणी, २४ जून १८२३(१५५) ; न्याय, राज्यकारभार वगैरे गोष्टीबाबत चर्चा, ८ जुलै १८२३(१६३) ; ब्रीक व विठोबा यांची सरकारी कामकाजाबाबत चर्चा, १९ जुलै १८२३(१६९–१७१); कारभाराविषयीच्या कलमांची चर्चा, १८ ऑगस्ट १८२३(१८४–१८७); इंग्रजांची दंडेलशाही, १२ सप्टेंबर १८२३(२०१) ; प्रतिनिधींना इनाम जमिनी देण्याचा अधिकार, विठोबा दिवाण याच्याशी ब्रीकच्या संत्र्यांची उद्धट वागणूक, २४ सप्टेंबर १८२३(२०६).

**सातारा शहर :** सातारा येथील जमाबंदीविषयीचे शेरे आदमच्या विचाराने देण्याची महाराजांची आज्ञा, १६ एप्रिल १८२३(११५) ; सातारा शहर इंग्रज लोक फार चाहतात असा कॅपलीन साहेबाचा शेरा, २५ मे १८२३(१३९) ; इंग्रज लष्करांतील लोकांशी देण्याघेण्याचा व्यवहार न करण्यासंबंधी साताऱ्यांत दवंडी, १२ ऑगस्ट १८२३ (१८३).

---

## पुडके क्रमांक ७

पृष्ठ क्रमांक १ ते २२२, (पत्र क. १९११३), इ. स. १८२३-१८२४

### (प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**खाजगी व वैयक्तिक :** महाराजांचा देवावर विश्वास, २२ ऑक्टोबर १८२३ (६); महाराजांचे ब्रम्हपुरीस आगमन, २२ नोव्हेंबर १८२३(२९) ; आप्पासाहेबांच्या कलावंतिणीने हिरे खाल्ल्यामुळे त्यावर औषधोपचार, २९ नोव्हेंबर १८२३(३३) ; महाराजांचे गुरु गोपाळशास्त्री यांस देवाज्ञा, १३ डिसेंबर १८२३(४६) ; शाहू महाराजांची पुण्यतिथी, २० डिसेंबर १८२३(४९) ; महाराज कनिष्ठ दर्जाच्या माणसाकडे जेवावयास जातात त्याबद्दल खुलासा, २५ डिसेंबर १८२३(५६) ; चॅपलीन व ब्रीक यांचा कोकणांत समुद्र स्नानास जाण्याचा विचार, १६ जानेवारी १८२४ (७१) ; आजारपणामुळे मॉरीसचे विलायतेस गमन, १२ एप्रिल १८२४(१२५) ; नरसू याच्या लग्नाप्रित्यर्थ भोजन समारंभाचा सरकारी वाड्यांत कार्यक्रम, ३ जुलै १८२४(१७५) ;

**छत्रपती व रेसिडेंट :** साताऱ्याहून महाराजांचे हुकूम येईपर्यंत प्रतापगड येथे साहेबांस जाण्याची बंदी केल्याबद्दल ब्रीकचे विठोबास निवेदन, २९ आक्टोबर १८२३(१०); मोगलाई स्वारांची छावणी शहरानजीक आणण्यासाठी महाराजांची ब्रीक यास सूचना, २९ आक्टोबर १८२३ (११) ; सह्याद्री घाटाचे

**छत्रपती व रेसिडेंट : चालू—**

हद्दीत कंपनी सरकारच्या चौक्या बसल्या असल्यास त्या उठवून महाराजांकडील बसवाव्यात म्हणून एलफिन्स्टन याची ब्रीक यास सूचना, २९ ऑक्टोबर १८२३ (**१३**) ; प्रचितगड, भैरवगड, वासोटा या तीन किल्यांच्या तहनाम्यातील कलमांसंबंधी ब्रीकचा सल्ला, २० नोव्हेंबर १८२३ (**२५**) ; अक्कलकोट येथे महाराजांच्या जाण्यामुळे अक्कलकोटकरांस ज्यादा खर्च आला त्याबाबत ब्रीकची नाराजी, ४ डिसेंबर १८२३ (**३७**) ; विलायतेहून ग्रँट साहेबास येणाऱ्या पत्रांत महाराज, विठोबा इत्यादींचा गौरव, ३१ जानेवारी १८२४ (**७७**) ; ग्रँटच्या पत्रांत महाराजांच्या आठवणींचा उल्लेख व आप्पासाहेबांविषयी आदर व्यक्त, १२ फेब्रुवारी १८२४ (**८६**) ; प्रतापगडावर जाण्यास महाराजांची असलेली मनाई साहेब लोकांनी मोडली तर दरवाजे बंद करावेत अशी ब्रीकची सूचना, १३ फेब्रुवारी १८२४ (**८७**) ; ब्रीकसाहेबांचे बंगल्यांतील खर्चाविषयी महाराजांची चर्चा, २३ मार्च १८२४ (**११३**) ; रंगून बंदराजवळील तीन बेटे घेतल्याबद्दल आनंदप्रदर्शनार्थ तोफा उडवण्याचा ब्रीकचा महाराजांना निरोप, २१ जून १८२४ (**१७२**) ; महाराजांचा जादा खर्च झाल्याने शिलकेंत आलेल्या तुटीची ब्रीकला खात्री पटवून देण्याचा विठोबाचा विचार, ९ जुलै १८२४ (**१७९**) ; तात्या अभ्यंकर यांचे घरी गणपतीचे उत्सावाकरिता जाण्यासाठी ग्रँट याचा होकार परंतु ब्रीक याचा नकार, ६ सप्टेंबर १८२४ (**२०९**).

**छत्रपतीचे नित्याचे व्यवहार :** (खालील पृष्ठांची तारीख १५ आक्टोबर १८२३ ते १ आक्टोबर १८२४ अशी आहे).

**अर्थव्यवहार :** १५७.

**खाजगी :** ३५, ३६, ४३, ६५, ११४.

**जहागिरदारविषयक :** १२, ५१, ११८, १५२, १५३, १५४, १६४, १६५, १६६.

**धार्मिक :** ६४, ७९, ९९, ११५, ११६, १२०.

**न्यायदान :** २४, २६-२८, ३०-३२, ३९-४२, ४५, ५३, ५४, ५५, ५७, ६६, ८०-८२, ११९, १२२, १३३-१३५, १५५-१५७, १६०-१६३, १६७.

**मामलत :** २३, ४८, ५०, ६१.

**राज्यकारभार :** २-५, ७-९, १५-२०, ३८, ४३-४४, ४७, ५८, ६२, ६३, ६८-७०, ७२-७६, ७८, ८३-८५, ८८-९१, ९४-९६, १००, १०४-११२, ११७, १२१, १२३, १२४, १२६-१२८, १३१, १३७-१३९, १४१-१४४, १४७, १४९-१५१, १५७-१५८, १६८-१७१, १७३-१७८, १८०-१९५, १९७-२०८, २११-२२०.

**जहागिरदार :** मालोजी भोसले अक्कलकोटकर यांचे नांवच्या शिक्क्याची बनावट, २९ आक्टोबर १८२३ (**११**) ; साळुबाई डफळे हीस देवाज्ञा, २३ डिसेंबर १८२३ (**५२**) ; छत्रपति आणि पटवर्धन वगैरे सरंजामदार यांच्यामध्ये मुलुखाच्या हद्दी व हक्क याबाबत चाललेल्या तंट्याचे ब्रीक साहेबास निवेदन, २९ डिसेंबर १८२३ (**५९**).

**धार्मिक :** संस्कृत पोथ्यातून दिलेल्या नीतिबाबत एलफिन्स्टनचा अभिप्राय, २२ नोव्हेंबर १८२३ (**२९**) ; सचिव, जानराव नाईक, प्रतिनिधी, सेखमीरा यांच्याकडे विदुरनीति, पंचोपाख्यान या ग्रंथाच्या प्रतींची रवानगी, १८ फेब्रुवारी १८२४ (**९२**) ; महाराजांकडून समुद्रपूजा व ब्राह्मण भोजन, दाभोळाहून जहाजातून केलेल्या प्रवासाचे वर्णन, २९ फेब्रुवारी १८२४ (**९७**) ; मुनीर साहेबाच्या लेकाचे सुंताप्रसंगी आहेर, १८ एप्रिल १८२४ (**१२९**) ; नवरात्र महोत्सवातील अष्टमी व्रत, ३० सप्टेंबर १८२४ (**२२१-२२२**).

**राजकीय :** रसूलसाहेब (हैद्राबादचा रेसिडेंट) व नबाब यांच्यांत मतभेद, २९ डिसेंबर १८२३ (**६०**) ; बाजीराव पेशव्यांनी देवदर्शनासारख्या साध्या प्रवासास इंग्रजांचे संरक्षण स्वीकारले असे सांगण्यांत महाराजांनी खाजगी पैसा खर्च करून इंग्रजांचे संरक्षण मागावे असा रेसिडेंटचा हेतू असावा अशी महाराजांची कल्पना, १८ फेब्रुवारी १८२४ (**९२**) ; कोकणांतील इंग्रजांच्या पलटणींत ब्राह्मणांकडून फितुरी, इंग्रजांचा ब्राह्मणांवर अविश्वास, ६ मार्च १८२४ (**१०२**) ; ब्राह्मणांनी केलेल्या फितुरीबद्दल ब्रीक यास निवेदन, फितुरी ब्राह्मणांचा बंदोबस्त करण्याबद्दल कप्तानाचा महाराजांस

दप्तर क्रमांक ३९, पुडके क्रमांक ७—चालू

**राजकीय : चालू—**

निरोप, ६ मार्च १८२४ (१०३) ; बंडखोर गोसाव्यांस अटक, ४ मे १८२४ (१४०); संभाजीराजे सातारकर यांचे नांवे अजमेर येथे झालेल्या बंडाव्यांत पकडलेल्या संशयीत माणसांच्या जबान्या, ८ मे १८२४ (१४५-१४६); ब्रीक व महाराज यांच्यात विनुष्ट, २ जून १८२४ (१५९); चँपलीन, एल्फिन्स्टन व ब्रीक यांच्यामुळेच हिंदू राज्यांच्या अब्रूचे संरक्षण होईल अशी ग्रँट याची खात्री, २१ जुलै १८२४ (१८४).

**राज्यकारभार :** खंडू शिंदा हुजऱ्याने इंग्रजांचे लढाईत चाकरी केल्यामुळे बाजीरावांचे लष्करांत त्यांस अबदागिरीचा मान, १४ आक्टोबर १८२३ (१) ; आप्पासाहेब व विठोबा यांच्याकडून अदालत, दप्तर, खजिना, शिबंदी वगैरे कामाची पाहणी, २२ आक्टोबर १८२३ (६) ; खाजगीवाले यांना भररस्त्यांत रथ ओढण्यास मनाई, १५ नोव्हेंबर १८२३ (२१) ; किल्ल्यांची वाटणी, १५ नोव्हेंबर १८२३ (२२); ब्रीक व पलटणचे साहेबलोक यांना मेजवानी व ब्रीक यास पोषाख, ३० नोव्हेंबर १८२३ (३४) ; पोलादजंग व दौलतराव शिंदे यामध्ये शहाणा कोण अशी ब्रीक यास विचारणा, २९ डिसेंबर १८२३ (६०) ; मिठाच्या भावासंबंधी जाहीरनामा, ९ जानवारी १८२४ (६७) ; हिंदुस्थानांत असलेल्या इंग्रजांच्या सत्तेबाबत निवेदन, अमृतराव पेशवे यांनी संन्यास घेतल्यास त्यांना मिळणाऱ्या नेमणुकीत कपात होण्याचा संभव व बाजीराव, चिमाजी आप्पा यांना मिळणाऱ्या नेमणुकींत बटा व हुंडणावळीमुळे तूट येण्याची कल्पना, १९ फेब्रुवारी १८२४ (९३) ; पन्हाळकरांचे मालवण येथे गमन, २९ फेब्रुवारी १८२४ (९८) ; शिर्केमंडळीस पोषाख, ४ मार्च १८२४ (१०१) ; वाल्याबा याजकड सरलष्करकडील कामगिरी, १८ एप्रिल १८२४ (१३०) ; संत्री लोकांची नेमणूक करण्याविषयी ब्रीक यांस सूचना, २३ एप्रिल १८२४ (१३२) ; सातारा किल्यावरील पाणी पाहण्यास ब्रीक व महाराजांचे गमन व बंड करणाऱ्या महंमदखानाची ब्रीककडे रवानगी, २७ एप्रिल १८२४ (१३६); साताऱ्यास पाण्याचा दुष्काळ, १२ मे १८२४ (१४८) ; होलटणसाहेबाचे हाताखालील साहेबाने मुम्बईस अदालतीच्या चपराशास शिवीगाळ करून हाकलून दिले त्याबद्दल त्यास शिक्षा व दंड, १३ ऑगस्ट १८२४ (१९६) ; आप्पासाहेबांकडून अदालत, खजिना, शिबंदी, वगैरेची पहाणी, २ सप्टेंबर १८२४ (२०७) ; पुण्यांत पाण्याचा तुटवडा असल्याबद्दल ब्रीक याचे विठोबा यास निवेदन, ९ सप्टेंबर १८२४ (२१०) ;

**सातारा शहर सुधारणा :** विहीरीचे काम करण्याबद्दल ब्रीकची सूचना, २९ आक्टोबर १८२३ (११); रस्त्यांत घाण करणाऱ्यास दंडाची शिक्षा, ३० ऑक्टोबर १८२३ (१४).

---

## दप्तर क्रमांक ४०

### पुडके क्रमांक १ ते ४

### पुडके क्रमांक १

पृ. स. १–२३०, (पत्र क्र. १९११४), इ. स. १८२४-१८२५

**(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी, दि. २-१०-१८२४ ते २३-१०-१८२५)**

**आर्थिक :** कित्तूरकर देसाई व ब्रीक यांचे पैशाविषई खलबत, २८ ऑक्टो. १८२४ (**१२**) ; वतनदारांनी केलेल्या घर अथवा दुकान विक्रीच्या रकमेतील चौथाई सरकारात न देण्याचा कायदा, १३ नोव्हें. १८२४ (**२७**); जमाबंदी करण्यासंबंधी विठोबा व ब्रीक यांचे खलबत, ५ डिसें. १८२४ (**३६**); बळवंतराव चिटणीस याचे इनामांची विक्री करून कर्ज फेडावे म्हणून विचार, ७ जुलै १८२५ (**१५५**).

**खाजगी :** कोल्हापूरचे शंकराचार्य हे संन्यासी म्हणून ब्रीक यास भेटण्याची अशक्यता, बाळाजीपंत नातू यांस भेटण्याची महाराजांची इच्छा, ८ जून १८२५ (**१३२**); महाराजांचे ताब्यांतील मोगलाई रिसाला, १२ जून १८२५ (**१३८**); अक्कलकोटकर, जानराव नाईक, डफळे, शेख मिरा, प्रतिनिधी, सचिव वगैरे मंडळींना दसऱ्याचे आमंत्रण, १९ सप्टें. १८२५ (**२०७**).

**घाटचौक्या :** कुंभारलीच्या घाटाची दुरुस्ती, ७ मार्च १८२५ (**८७**) ; कुंभारली घाट कंपनी सरकारने नीट केला म्हणून महाराजांनी बक्षिस द्यावे अशी ब्रीक याची सूचना, ११ जून १८२५ (**१३६**); पारघाट नीट व्हावा असे महाराजांचे म्हणणे, २२ ऑगस्ट १८२५ (**१८४**).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार : (खालील पृष्ठांची २ ऑक्टो. १८२४ ते २३ ऑक्टो. १८२५ ही तारीख आहे.)**

**आर्थिक :** ८, ९, ३२, ७९, ८३, ९७, ११६, ११७, १३१, २००, २११, २१२, २२८.

**इनाम–सरंजाम वगैरे :** २१४.

**खाजगी :** १५, १९, २३, ३१, ४२, ५०, ५३, ५६, ५९, ६०, ६२, ६३, ६५, ७६, ७७, ८४, ८९, ९०, ९१, १०२, १०७, १०९, ११०, १११, ११५, ११९, १२६, १३५, १४१, १४७, १५१, १५२, १५६, १५९, १६३, १६६, १६७, १७२, १७४, १७८, १७९, १८८, १९०, १९१, १९६, २०६, २०८, २०९, २१८, २२६.

**न्याय :** १८९.

**नित्यनियम :** १, ३, ५, १८, २१, २२, २६, २९, ३०, ३५, ४१, ४५, ५१, ६१, ६४, ६६, ७३, ७४, ८०, ८६, ८८, ९२, ९३, १००, १०८, ११२, ११४, १२१–१२४, १५३, १५७, १६२, १७३, १७७, १८३, १९२, १९३, १९४, १९५, २०१, २१०, २१७, २१९, २२१, २३०.

**राज्यकारभार :** २, ४, ६, ११, १३, २५, ३४, ४३, ४६, ४७, ४८, ५८, ६७, ६९, ७०, ७१, ७२, ८२, ८५, ९८, ९९, १२५, १२८, १२९, १३९, १४०, १४८, १४९, १५०, १५४, १५८, १६०, १६१, १६४, १६५, १६८, १८७, २०३, २०४, २२३, २२४, २२५, २२७, २२९.

**शीवतंटा, बंदोबस्त वगैरे :** ४९, २१३, २१४.

**स्वार, शिबंदी, जहागिरदार वगैरेबाबत :** ७८, ९४, १०४, १०५, ११८, १४४, १४५, १४६, १८१, १८२, १८५, २१६.

**जहागिरदार :** (सातारा राज्यांतील) कित्तूरकर देसाई व इंग्रज यांचा खटका, ३१ ऑक्टो. १८२४ (**१६**) ; प्रतिनिधी व्यसनी आहेत असे ग्रँटचे म्हणणे, १० नोव्हें. १८२४ (**२४**); आपला बचाव करावा म्हणून कित्तूरकरांची साहेबास विनंती, ६ डिसें. १८२४ (**३७**); शाहू महाराजांच्या पुण्यतिथी-निमित ब्राह्मणांस दान, अक्कलकोटवाले यांची इंडी व सिंदगी ही ठाणी घेतल्याबद्दल विठोबा यास पत्र, ८ डिसें. १८२४ (**३८**); विठोबा दिवाणाचा मृत्यू, ११ एप्रिल १८२५ (**१०१**); रामराव डफळे यांस जहागिरी व सरदेशमुखी अमलाची बहाली, १० मे १८२५ (**१२०**); अक्कलकोटकर यांची मोगलाईपैकी दोन गावे गेली त्याजबद्दल, १९ सप्टें. १८२५ (**२०५**).

**जमीन महसूल :** पावसाच्या दुर्भिक्षामुळे द्यावयाची सूट, १ नोव्हें. १८२४ (**१७**).

**दप्तर क्रमांक ४०,** पुडके क्रमांक १—चालू

**धार्मिक व सामाजिक :** राज्याची वसुली, खर्च व शिल्लक याबाबत महाराज व ब्रीक यांचे खलबत, २६ ऑक्टो. १८२४ (**१०**); उरसास जाणाऱ्या चॅपलीनबरोबर द्यावयाच्या सरंजामासंबंधी ब्रीक व विठोबा यांचीं बोलणीं, २९ ऑक्टो. १८२४ (**१४**); मुलीचे नामाभिदानासाठीं ज्योतिषांकडून मुहूर्त व नक्षत्राची पाहणी, ६ जाने. १८२५ (**५२**); संक्रातीनिमित्य महाराजांचे कृष्णा स्नान व बारशाची योजना, १४ जाने. १८२५ (**५५**); फडणीस यांच्याकडे लग्नासाठीं महाराजांचे गमन व तेथून परळी येथे जाऊन देवास नेमणूक करार, ११ फेब्रु. १८२५ (**७५**); दाजीबा उपाध्ये यांच्या मुलाचे लग्न, २९ एप्रिल १८२५ (**११३**); एल्फिन्स्टन गव्हर्नरकडे "सिंहासन बत्तीसी" च्या कथेचे पुस्तक रवाना, ९ जून १८२५ (**१३४**); रास्ते यांचा निंबोणी इनाम गांव पंढरपूरचे देवास इनाम, १२ जून १८२५ (**१३७**); शंकराचार्यांचे ब्राह्मणांच्या धर्मवर्तनासंबंधीचे विचार व त्यावर महाराजांच्या सूचना, १९ जून १८२५ (**१४२**); महाराजांकडून शंकराचार्यांची पूजा, २१ जून १८२५ (**१४३**); रामायणाच्या बखरी, ९ ऑगस्ट १८२५ (**१७६**); कोरेगांव पेटयांत शिकारीस गेलेल्या गोऱ्या लोकांकडून पाटील व शिपाई लोकांच्या बायकांवर अत्याचार, २४ ऑगस्ट १८२५ (**१८६**).

**भारतीय संस्थाने :** शंभूसिंग बाजीरावाच्या गुलामाने हिंदुस्थानांत केलेले बंड, १९ जाने. १८२५ (**५७**); कोल्हापूरकरांचे वारणे अलिकडे आगमन, ३१ मार्च १८२५ (**९५**).

**राजकीय :** एल्फिन्स्टन याच्या सद्वर्तनाबद्दल ग्वाही, पलटणाचे सान्निध्य, २८ ऑक्टो. १८२४ (**१२**); बाजीराव व इंग्रज यांच्या तहासंबंधीची वदंता, ९ ऑगस्ट १८२५ (**१७५**).

**राज्यकारभार :** मोगलाई स्वार कमी करू नये म्हणून ब्रीक याची महाराजांना विनंती, १९ ऑक्टो. १८२४ (**७**); ब्रीग्ज याचे सांगण्यावरून आदम साहेब यानी खटाव व विजापूर येथे केलेली प्रतबंदी, ६ नोव्हें. १८२४ (**२०**); वारणेजवळ जमा झालेल्या बेरडांचा बंदोबस्त करण्यासाठीं इंग्रजांच्या व महाराजांच्या पलटणी रवाना, २७ नोव्हें. १८२४ (**३३**); कित्तूर घेतल्याबद्दल ब्रीग्ज याजकडून विठोबा यास बातमी, ११ डिसें. १८२४ (**३९**); अक्कलकोटजवळ बंड झाल्यामुळे सरंजाम वाढवून मिळावा म्हणून बापूजीपंतांची विनंती, १२ डिसें. १८२४ (**४०**); ठकार, दीक्षित, चिदांबर स्वामीचे लेक, बालाप्पा देशपांडे वगैरे लोकांस धरून देणाऱ्यास इनाम दिले जाईल म्हणून जाहीरनामे, २१ डिसें. १८२४ (**४४**); कंपनीसरकारचे मुलुखाची मोजणी, १० जाने. १८२५ (**५४**); आदम व ब्रीग्ज यांनी एक विचारे जमीन मोजणी करण्यास महाराजांची संमती असल्या-बद्दल विठोबा याचा आदम यास निरोप, ४ फेब्रु. १८२५ (**६८**); महाराजांच्या राज्यकार-भारासंबंधी ब्रीक यांची नाराजी, २३ फेब्रु. १८२५ (**८१**); कोल्हापूरकर महाराजांचे हद्दीत येणार म्हणून कंपनी सरकारचा बंदोबस्त, २ एप्रिल १८२५ (**९६**); विठोबा दिवाणाचे जागीं त्यांचे पुत्र गोविंदराव यांची नेमणूक, १५ एप्रिल १८२५ (**१०३**); गोविंद विठ्ठल याने कोणती कामें करावी त्यासंबंधीचा खुलासा, १७ एप्रिल १८२५ (**१०६**); विठोबा दिवाणानंतरच्या दिवाण नेमणुकींत ब्रीक याचा सल्ला, ८ जून १८२५ (**१३३**); प्रतबंदी व मोजणीसंबंधी ब्रीक, चॅपलेन व आदम यांचा विचारविनिमय, १३ सप्टें. १८२५ (**१९७-१९८**); अवर्षणामुळे काय करावे म्हणून महाराजांना काळजी, १७ सप्टें. १८२५ (**२०२**); नाशिकला जाताना पुणे मुक्कामी महाराजांचा मुक्काम होईल म्हणून वदंता, १३ सप्टें. १८२५ (**१९९**); फौजेचे बंड मोडता येते परंतु रयतेचे बंड मोडतां येत नाही असे महाराजांचे म्हणणे, मोगल बादशहाच्या कर्जाचा इंग्रजांनी हवाला घेऊन त्यांचे राज्य सांभाळले अशी महाराजांची समजूत, ४ ऑक्टो. १८२५ (**२२०**).

**सातारा शहर सुधारणा :** साताऱ्च्या घरांची मोजणी व सफाई पट्टी लागू, ६ जून १८२५ (**१३०**).

**स्वार, शिबंदी, तोफखाना इतर :** नाशिकची स्वारी व मोगलाई स्वार यासंबंधी ब्रीग्ज, एल्फिन्स्टन वगैरेचा विचार-विनिमय, ३० जुलै १८२५ (**१६९–१७१**); रिसाल्यांत मराठे, मुसलमान, परदेशी, कुणबी स्वार असावेत असे ब्रीग्ज याचे मत, १६ ऑगस्ट १८२५ (**१८०**).

## पुडके क्रमांक २

पृष्ठ सं. १–२३७ पत्र क्र. १९११५, इ. स. १८२५-२६

(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**छत्रपती व रेसिडेंट :** फौज व किल्याच्या बंदोबस्ती सामानांत वाढ करण्यासाठी महाराजांनी ब्रीग्ज याजकडे केलेल्या मुलुखाच्या मागणीस कंपनी सरकारचे संरक्षण व महाराजांच्या राज्यास शत्रू नाही ह्या सबबीवर ब्रीक याचा नकार, अक्कलकोटकरांच्या गांवासंबंधी चॅपलीन याने केलेल्या हुकुमांत फेरबदल करता येणार नाही असे ब्रीक याचे महाराजांना सांगणे, ३० नोव्हें. १८२५ (२९); महाराज व ब्रीक यांची नगरच्या किल्ल्यास भेट व तेथील हत्यारे, तोफखाना वगैरेची पहाणी, ९ डिसें. १८२५ (३४); (३५); कोल्हापूरच्या महाराजांनी इंग्रजांशी केलेल्या दोस्तीसंबधी ब्रीग्ज याचे मत, २६ फेब्रु. १८२६ (८१); बळवंतराव भोसले सरलस्कर यांनी केलेल्या पेटावार शिबंदी, इनामदार वगैरेच्या चौकशी, १३ एप्रिल १८२५ (१०३); (१०४); फलटणकरांकडील दत्तक प्रकरण, १३ एप्रिल १८२५ (१०५); सचिवांकडील तंटा, १३ एप्रिल १८२५ (१०७); कृष्णराव फडणीस याची ब्रीककडील चाकरी, १३ एप्रिल १८२५ (१०८); चाकरी केलेल्या लोकांना इनाम देण्याबद्दलचा छत्रपतींचा विचार, यासंबंधी छत्रपतींची ब्रीक याचेशी चर्चा, १३ एप्रिल १८२५ (१०९); प्रतिनिधी याच्या स्त्रियांच्या नेमणुकासंबंधी व खाजगीवाल्यांकडील गांवे यासंबंधी चिटणीस याजकडून ब्रीक याजकडे जाब रवाना, १६ एप्रिल १८२५ (१११); अक्कलकोटकर भोसले व जानराव नाईक यांनी महाराजांच्या ताब्यांत रहावे असे ब्रीक याचे मत, २१ मे १८२६ (१३०-१३१); महाराजांचे ब्रीक याच्याशी काशीपंत बेंद्रे, दाजी नारळकर व बज्याबा नाईकसंबंधी झालेले बोलणे, ९ जून १८२६ (१४६-१४७); गव्हर्नर एल्फिन्स्टन व महाराज अक्कलकोटकर जहागिरदार यांची भेट, १९ सप्टें. १८२६ (२२३);

**छत्रपती खाजगी :** प्रतापगड येथे जाऊन देवीचे दर्शन, १४ एप्रिल १८२५ (११०); आप्पासाहेबांचे प्रतापगडी गमन व छत्रपतींच्यावरुन माईसाहेब यांनी केलेल्या नवसाची फेड, ३० एप्रिल १८२५ (१२०).

**छत्रपतीचे नित्याचे व्यवहार : (खालील पृष्टांची २१ सप्टे. १८२५ ते १० ऑक्टो. १८२६ ही तारीख आहे.)**

**छत्रपती व रेसिडेंट संबंध :** १-२, १२, १४–१६, १८, २२, २८, ३१-३२, ३८, ४१, ४७, ४९-५०, ५२–५७, ६३, ६५, ७०–७२, ८०, ८४, १२५, १३२, १३५, १३७, १४५, १५१-१५२, १५४–१५६, १६४, १६७, १६८, १७२, १७४–१७८, १८२, १८६, १८९-१९०, २०२, २११, २१८-२१९, २२४–२२६, २२८-२२९.

**छत्रपती खाजगी :** ३, १३, ४६, ८२-८३, १२८, १३६, १३८-१३९, २२०, २३३.

**जहागिरदारांसंबंधी :** ५१, १३३-१३४, १४३, १४९, १५९–१६३, १६५-१६६, १७९, २००, २०७, २१७, २३२.

**राजकारणी :** ४२.

**राज्यकारभारासंबंधी :** ५, १०, ३३, ४४, ४८, ५८–६१, ६४, ६६–६९, ७४–७९, ८५–८७, ११२, १२६-१२७, १२९, १४०-१४१, १४४, १५०, १५३, १५७-१५८, १६९–१७१, १७३, १८०-१८१, १८३-१८४, १८७-१८८, १९१–१९७, १९९, २०५–२०६, २०८–२१०, २१२–२१६, २२१-२२२, २२७, २३०-२३१, २३४–२३७.

**सामाजिक :** २०३.

**जहागिरदारांसंबंधी :** रामराव डफळे दसऱ्याचे स्वारीस हजर न राहिल्याकारणावरुन त्यांच्या गांवाची जप्ती, २२ नोव्हें. १८२५ (१९-२०); शेतातील रस्त्याने जाण्यावरुन महाराज व अक्कलकोटकर भोसले यांच्या शिपायांत झालेल्या मारामारीसंबंधांत त्या शिपायांच्या झालेल्या जबान्या, २५ नोव्हें. १८२५ (२३–२७); अक्कलकोट सरदेशमुखी प्रकरणी पंचायत नेमण्याचे ठरल्यामुळे महाराजांचे समाधान, नगर, खानदेश, बागलाण, गंगथडी, कर्नाटिक, धारवाड, कोकण व सोलापूर भागांत बंदोबस्ताची व अधिकारी लोकांची कमतरता असल्यामुळे व नवीन कायद्यामुळे चोऱ्या

**जहागिरदारांसंबंधी : चालू—**

फार होतात असे महाराजांचे मत, १३ डिसें. १८२५ (३९); जहागिरदार व कंपनी सरकार यांच्यामध्ये होणाऱ्या वाटाघाटींची माहिती ठवावी म्हणून महाराजांची आप्पासाहबांना ताकीद, १४ डिस. १८२५ (४०); प्रतिनिधी व निपाणीकर यांच्या गांवाच्या सीमा वादांत गांवकऱ्यांना मारहाण, २४ डिसे. १८२५ (४५); कोल्हापूरचे महाराज व कंपनीसरकार यांच्या दोस्तीसंबंधांत महाराजांचे मत, ७ फब्रु. १८२६ (७३); जानराव नाईकानंतर बज्याबा नाईक यास दत्तक घेण्यासंबंधी इंग्रजांच्या संमतीची मागणी, १७ मार्च १८२६ (८८); (९३–९६); जानराव नाईक याचा फलटण येथे मृत्यू, १७ मार्च १८२५ (८९); फलटणच्या बंदोबस्ताबद्दल छत्रपती यांचेशी नाईक यांची चर्चा, २०–२३ मार्च १८२५ (९०–९२); पटवर्धन यांचे महाली पडलेल्या दरवड्याबद्दल रामराव डफळे याचे पत्र, २९ मार्च १८२५ (९७); स्त्रीच्या नेमणुकेबद्दल प्रतिनिधी यास पत्र, ५ एप्रिल १८२५ (१००); फलटणच्या व्यवस्थेबद्दल बजाबा नाईक याची विनंती, १० एप्रिल १८२५ (१०१); कुरुंदवाडकर पटवर्धन याजकडील दत्तक घेण्यास गोपाळराव पटवर्धन यास इंग्रज सरकारची मनाई, ११ एप्रिल १८२५ (१०२); अक्कलकोटकर कानोजी भोसल याच्या तटंयाबद्दल विसाजीपंत याची चँपलीन यास विचारणा, १३ एप्रिल १८२५ (१०६); प्रतिनिधीकडील वकील व स्त्रियांच्या नेमणुकांबद्दल छत्रपतींशी दाजीबा वकीलाचा जाबसाल, १७ एप्रिल १८२५ (११४); फत्तेसिंग भोसले व त्यांचे भाऊ कुरळेकर तुळजाजी भोसले यांचे वाटणीसंबंधीच्या चौकशीसंबंधी महाराजांचे मत, ९ मे १८२६ (१२४).

**राजकीय :**

वालखिडीस नाशिकचे ब्राह्मण वाड्याचे वाटेने न जातां दुसऱ्या वाटेने जाण्यासंबंधी स्मिथ साहेबास कळविण्याविषयीं ब्रीक साहेबाचे महाराजांशी झालेले बोलणे, जनरल स्मिथने छावणी मोडली त्याबद्दल, ३१ आक्टो. १८२५ (६) ; मध्यस्थामुळे बाजीरावाशी वांकडेपणा आला असे ब्रीक याच मत, पिकांना होणारा उपद्रव कंपनीचे लष्कराचा नसून महाराजांचे लष्कराचा आहे असे ब्रीक याच निवदन, बाजीराव व एल्फिन्स्टन यांचे जमत नसल्यामुळे बदली करून घेण्याचा एल्फिन्स्टन याचा यत्न, ३ नोव्हें. १८२५ (७), (८), (९) ; परवानगीशिवाय त्रिंबकजी याच मुलाची जानराव नाईक निंबाळकर यांनी भेट घेऊन त्यास गोटांत आणले हे गैरकृत्य झाले असे ब्रीक याचे मत, ८ नोव्हें. १८२५ (११) ; रयतेस कंपनीसरकारचे लष्कराचा उपद्रव होत नसून महाराजांचेच लष्कराचा होतो असे इंग्लिशांचे मत, १६ नोव्हें. १८२५ (१७) ; महाराज व अक्कलकोटकर भोसले यांच्या संघर्षात अक्कलकोटकरांचा इंग्रजांचे अंकित म्हणून राहण्याचा मनोदय, २३ नोव्हें. १८२५ (२१) ; दाजीबा घोरपडे यांना सरदारी, ५ मे १८२६ (१२३).

**राज्यकारभार :**

लोणंद येथे महाराज जाताना लोक रस्ता सोडून चालले म्हणून सरकारी अधिकाऱ्यास ताकीद, २५ आक्टो. १८२५ (४) ; त्रिंबकजी डेंगळे याच्या लोकांनी सचिवांची भेट घतली त्यावळी झालेली जानराव याची भेट व महाराजांच्या गैरहजेरीत साताऱ्यास डेंगळे कुटुंबियांना साहेब लोकांचा त्रास होतो अशी महाराजांची तक्रार, ३ डिसें. १८२५ (३०) ; अकोलनेर येथून होणाऱ्या प्रवासांत वाटेने पाण्याची गैरसोय व शेखदार मामलेदार यांची गैरहजेरी यामुळे योग्यतेस कमीपणा आला असे महाराजांचे मत, १० डिसें. १८२५ (३६) ; इंग्रजांनी सरकारी नोकरांना पेन्शन देण्याचे ठरविल्यास त्याच्या परिणामाचे महाराजांनी केलेले निवेदन, ११ डिसें. १८२५ (३७) ; ब्राह्मणांस दिलेल्या इनाम गांवाबाबत आदम साहेब याने घेतलेला निर्णय योग्य आहे असे महाराजांचे मत, १७ जाने. १८२६ (६२) ; वाई पट्टा व सिंगणापूरमधील वसुलीसंबंधी पहाणी, ३ एप्रिल १८२५ (९९) ; शिबंदी, इनामदारांची चौकशी याबद्दल बळवंतराव भोसले व दिनकरराव मोहिते यांचेकडून बोलावयाची कलमे, १७ एप्रिल १८२५ (११३) ; कृष्णराव याच्या चाकरीबद्दल छत्रपतींशी जाबसाल, १७ एप्रिल १८२५ (११५) ; कऱ्हाड येथील वसुलीची पेटावार चौकशी, १९ एप्रिल १८२५ (११६) ; कंपनी सरकारकडे चाकरीस असलेल्या चोराबद्दल रामराव डफळे याचे पत्र, २३ एप्रिल १८२५ (११७) ; पाटील, कुलकर्णी, सेखदार, मामलेदार, वगैरेच्या चाकरीबद्दल जाहीरनामा, २५ एप्रिल १८२५ (११८) ; पद्माकर रघुनाथ याच्या इस्ताव्याच्या वसुलीबद्दल छत्रपती यांस पत्र, २८ एप्रिल १८२५ (११९) ; अदालतीचे काम,

**राज्यकारभार : चालू—**

स्वार, खजिना वगैरे कामाची पहाणी, २ मे १८२५ (**१२१**); जहागिरदार वगैरेकडून छत्रपतींना येणाऱ्या पत्रांत क्षत्रियकुलावतंस हा मायना न घालतां छत्रपती असे असते त्यासंबंधी, ३ मे १८२५ (**१२२**) ; कारकुनाने लांच घेतल्याचे सिद्ध झाल्यास आरोपीस बेड्या घालून तट्टावर बसवून धिंड काढावी व गुन्हा केल्याबद्दल दंड घ्यावा म्हणून जाहीरनामा काढण्याचा हुकूम, २६ जुलै १८२६ (**१८५**) ; माधवराव रास्ते यांचे मृत्युनंतर त्यांची पत्नी सती गेली तेव्हां पुढे दत्तक व सरंजाम याबाबत, ९ ऑगस्ट १८२६ (**१९८**) ; चिंतामणराव पटवर्धन यांनी आपल्या सुनेस इंग्रजांचे संमतीशिवाय दत्तक दिला त्यासंबंधी, १४ ऑगस्ट १८२६ (**२०१**).

**स्वार, शिबंदी व तोफखाना :** तोफखानेवाले पानसे यांचे पेन्शन व सरंजाम यांच्या औरस मुलाकडे निम्मे चालविण्याच्या ठरावाची आबा पिंगळ यांनी सांगितलेली माहिती, २० डिसेंबर १८२५ (**४३**) ; स्वारांनी करावयाची चाकरी व स्वारीचे वेळेचा शिपायांचा बंदोबस्त याबाबत हुद्दार व बक्षी यांना महाराजांच्या ताकीदी, १६ जून १८२६ (**१४८**).

---

## पुडके क्रमांक ३

पृष्ठ क्र. १—२८७, पत्र क्र. १९११६, इ. स. १० ऑक्टो. १८२६ ते २९ सप्टें. १८२७

### (प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**किरकोळ :** बाल्याबाचे घरी नाच पाहण्यास समसेन यास निमंत्रण, २४ नोव्हें. १८२६ (**३३**) ; समसेन यास नाच व गाण्याची आवड, २७ नोव्हें, १८२६ (**३४**) ; बाल्याबाच्या मुलीच लग्नास बाळाजीपंत नातू व दाजीबा घोरपडे यांचे गमन, २६ जाने. १८२७ (**६५**) ; ब्रीक याने दिलेल्या घोड्याची समसेन याजकडून मागणी, ३१ मार्च १८२७ (**१०७**) ; रॉबिन्सन याच्या तंबूसाठीं खास शिप्यास निमंत्रण, १० जुलै १८२७ (**१९७**) ; सचिवांच्या प्रकृतीत बिघाड, १३ जुलै १८२७ (**२०२**).

**खाजगी :** नीरेजवळील रनाईच्या डोहांतील माशांची शिकार, ३० डिसें. १८२६ (**५२**) ; संक्रांतीप्रित्यर्थं एल्फिन्स्टन, स्मिथ, सातारकर मंडळीं वगैरेंना तिळगूळ, पत्र व थैल्या रवाना, १२ जाने. १८२७ (**५७**) ; बाळाजीपंत नातू व महाराज यांचे संभाषण, १४ म १८२७ (**१३८**).

**छत्रपती व रेसिडेंट :** समसेन व महाराज यांची पुसेसांवली येथे भेट, १४ ऑक्टो. १८२६ (**३**) ; एल्फिन्स्टन, गव्हर्नर व महाराज यांची भेट व गव्हर्नरांचे आदरातिथ्य, २९ ऑक्टो. १८२६ (**१२**) ; महाराजांच्या राज्यकारभाराच्या पद्धतीवर गव्हर्नरचा उत्तम अभिप्राय, २ नोव्हें. १८२६ (**१४**) ; राज्याचा बंदोबस्त तसाच राखण्याबद्दल गव्हर्नरचे मत, आप्पासाहेब, बाळाजीपंत नातू, ग्रँट, महाराज वगैरेचे संभाषण, ३ नोव्हें. १८२६ (**१६-१७**) ; समसेनशी दोस्ती राखण्याबाबत वारडीनची सूचना, ११ नोव्हें. १८२६ (**२३**) ; गव्हर्नराकडून महाराजांच्या खुशालीची चौकशी, ११ नोव्हें. १८२६ (**२४**) ; सचिव, महाराज, एल्फिन्स्टन यांच्यांत एकोपा राहण्याची योजना, २४ नोव्हेंबर १८२६ (**३३**) ; जकातीसंबंधी महाराज व समसेन यांची चर्चा, १८ डिसें. १८२६ (**४६**) ; रस्त्यांचे कामकाज ब्रीक याच्या भावाकडे देण्याबद्दल समसेन व महाराज यांच्यांत चर्चा, २९ डिसें. १८२६ (**५१**) ; एल्फिन्स्टनबद्दल महाराजांचे अनुकूल मत, ५ जुलै १८२७ (**१९०**).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार : (खालील पृष्ठांची १० ऑक्टो. १८२६ ते २९ सप्टें. १८२७ ही तारीख आहे.)**

**जहागिरदारविषयक :** १, २, ८, २०, २५, २८, १६७, २५२-२५६.

दप्तर क्रमांक ४०, पुडके क्रमांक ३—चालू

**धार्मिक :** ७१, ७३, ७५, ९०-९१, ९४–९६, १११, १६६, १७४, १९३, २०३-२०४, २१३–२१७.

**न्यायदान :** ३६, ६३, ८०, ९८–१०१, १०६, १६५, २०१, २०६–२११, २२९–२३४, २४०–२४५.

**मामलत :** ४२–४५, ५०, ५४-५५, १३०–१३७.

**राज्यकारभार :** १०, १३, १५, १८, २२, ३०–३२, ३८–४०, ४८, ५९, ६२, ६४, ६७-६९, ७६, ७८, ७९, ८१, ८२, ८५, ८७–८८, १०३, १०८–१०९, ११३–११८, १२०–१२४, १२६–१२८, १३९–१४३, १४५, १४८–१५०, १५४–१५५, १६९–१७२, १७६–१७८, १८०, १८२–१८९, १९१–१९२, १९४–१९६, १९९, २००, २१८–२२७, २३७–२३८, २४६–२५०, २५८–२६०, २६२–२६८, २७०, २७२–२७५, २७७–२७८, २८०, २८२–२८७.

**जहागिरदार :** पटवर्धन मंडळींमध्ये चिंतामणरावांबद्दल गव्हर्नर यांचे अनुकूल मत, १७ नोव्हें. १८२६ (२९) ; कृष्णराव यास जहागिर देण्याबाबत विचारविनिमय, २५ डिसें. १८२६ (४९) ; निंबाळकर प्रकरणीं गव्हर्नर यांचेकडे पत्र रवाना, २६ जाने. १८२७(६५) ; पटवर्धन मंडळी व निपाणीकर यांच्यांतील सरहद्द प्रकरण, १३ जून १८२७(१६८).

**धार्मिक :** खंडोबा याच्या शष्ठी उत्सवांतील नाचगाणी ऐकण्यास कर्नल, समसेन व आप्पासाहेब वगैरेंची उपस्थिती, ३ डिसें. १८२६(३७) ; लग्नापूर्वी मौंजीबंधन आवश्यक म्हणून सवती, १३ फेब्रु. १८२७(७२) ; उदेपूर व कोल्हापूर येथून चालीरितीबाबतचे ग्रंथ आणण्याविषई समसेन याची सूचना, १६ फेब्रु. १८२७(७४) ; होळीपौर्णिमेचा समारंभ व धुळवडीचा खेळ, १२ मार्च १८२७(९२) ; मराठे जातीतील मुलींच्या लग्नाबाबत ठराव, २८ मार्च १८२७(१०४-१०५) ; रामनवमी उत्सवसमारंभ. ३१ मार्च १८२७(१०७) ; लग्नाप्रित्यर्थ सुट्या फार झाल्यामुळ ग्रहणाची सुटी रद्द, २६ एप्रिल १८२७(१२५) ; प्रभू व ब्राह्मण यांच्यांतील जातीविषई व धार्मिक कर्माबाबत वादविवाद, ३ जून १८२७(१५६-१५९) ; क्षत्रिय व मराठे यांच्या अधिकाराबाबत शास्त्राधारे महाराजांचे मत, ८ जून १८२७(१६२) ; शास्त्रासंबंधी चर्चा, १७ जून १८२७ (१७३) ; रोगहारक म्हणून मेंढा व अपमृत्यूहारक म्हणून म्हैस यांची दानें, १५ जुलै १८२७ (२०५) ; तीर्थविधीसाठीं बाळाजीपंत नातू यांचे पुण्याहून वाई येथे आगमन, ५ सप्टें. १८२७ (२६१) ; नवरात्र महोत्सव समारंभ, २२ सप्टें. १८२७(२७९) ; ब्राह्मण भोजनांत शिरण्यास सोनार व बैरागी यांना मनाई, २४ सप्टें. १८२७(२८१).

**बातमी :** खंडाळ्यास झालेली कंपनी सरकारच्या खजिन्याची लूट, ३ एप्रिल १८२७(११०) ; दौलतराव शिंदे यांचा मृत्यू व त्याच्या दोन बायकांत दौलतीबद्दल होणाऱ्या अपेक्षित भांडणाबद्दल चर्चा, ७ एप्रिल १८२७(११२).

**भारतीय संस्थाने :** कोल्हापूरकर व जहागिरदार यांचेशी इंग्रजांचे वाकडे, १४ ऑक्टो. १८२६(३) ; एल्फिन्स्टनची भेट घेण्याचा कोल्हापूरकरांचा संकेत, २२ ऑक्टो. १८२६(७) ; कोल्हापूरकरांबाबत समसेन व बाल्याबा यांची चर्चा, १२ मार्च १८२७(९२) ; अक्कलकोटकर भोसले यांच्या वेरूळ पाटीलकी जप्तीसंबंधात, ब्रीक व आदम यांचे हैद्राबाद येथे गमन, १० ऑगस्ट १८२७ (२२८) ; कोल्हापूर येथे पलटणे जाऊन करवीरकर लढणार असल्याची आवई, १७ ऑगस्ट १८२७(२३५).

**राजकीय :** कारस्थाने करील असा समसेनाबाबत संशय, १५ ऑक्टो. १८२६ (४) ; चतरसिंग यास सोडू नये अशी महाराजांची समसेन यास सूचना, २६ जाने. १८२७ (६५) ; इंग्रजी पलटणींत नाचाचे वेळीं भांडणे झाल्यामुळे दोन्हीं पलटणींवर पहारा, ७ फेब्रु. १८२७ (७०) ; महाराज कांही विशिष्ट राजकारणांत गुन्तले असल्याचा समसेन याचा संशय, २७ फेब्रु. १८२७ (८४) ; इंग्रजांशी दोस्ती व राज्यकारभारासंबंधीत खर्चावर लक्ष ठेवण्याची बाळाजीपंत यांजकडून सूचना, २२ मे १८२७ (१४४) ; इराण व रशिया यांचा तह करून मालकम येणार असल्याची वार्ता, १३ जून १८२७ (१६८) ; रशिया व इराण यांच्यांतील लढाई व इंग्रजी फौजेची अलिप्तता याबाबत समसेन याचेशी चर्चा, १८ ऑगस्ट १८२७ (२३९).

**राज्यकारभार :** आप्पासाहेबांकडून कामकाजाची पहाणी, १४ ऑक्टो. १८२६ (३) ; (११) ; ब्रीक याचे पुण्यास गमन, १७ ऑक्टो. १८२६ (५) ; एल्फिन्स्टनकडील खासे मंडळींस दसऱ्याचा पोषाख, वॉर्डन याची एकांतात भेट घेण्यास समसेन याची एल्फिन्स्टन यांजकडे विचारणा, १९ ऑक्टो. १८२६ (६) ; गव्हर्नर आल्यावर आनंदाप्रित्यर्थ दारू उडवण्याची एल्फिन्स्टन याजकडून व्यवस्था, २३ ऑक्टो. १८२६ (९) ; गव्हर्नर व वॉर्डन यांना मेजवानी व सनगे, ६ नोव्हें. १८२६ (१९) ; ब्रीक विलायतेस कायमचा जाणार म्हणून त्यास अंगठी व तलवार भेट देण्याचा विचार, ९ नोव्हें. १८२६ (२१) ; बायकांना उपद्रव देणाऱ्या संत्री पहारेकऱ्याचा बंदोबस्त करावा म्हणून समसेन याची ताकीद, १५ नोव्हें. १८२६ (२६) ; बळजबरीने कोणासही देवी काढू नयेत म्हणून डॉक्टरांना सूचना, १६ नोव्हें. १८२६ (२७) ; पंत अमात्य यांच्या काशी येथून आगमनाप्रित्यर्थ भोजन व वस्त्रे, देणेदार व सरकार पथकांचे खर्च यांच्या यादीची समसेन याजकडून मागणी, २८ नोव्हें. १८२६ (३५) ; कंपनी सरकारच्या स्वारांनी सिरवळचे कुरण कापल्याबद्दल वाई पेठाच्या मामलेदारांची तक्रार, १० डिसें. १८२६ (४१) ; माधवराव रास्त वगर सरदारांस पोषाख, २० डिसें. १८२६ (४७) ; शिंदे बांधणार असलेल्या दुकानांच्या साऱ्याबद्दल विचारणा, ३ जाने. १८२७ (५३) ; ब्रीक याच्या भावाकडे रस्त्याच कामकाज दण्याबद्दल गव्हर्नर यास विचारणा, ९ जाने. १८२७ (५६) ; महाराजांचे कोरेगांव येथून सातारा येथे गमन, १७ जाने. १८२७ (६०) ; जहागिरदारासंबंधी समसेन, वॉर्डन यांच्यांत चर्चा, १९ जाने. १८२७ (६१) ; पागेच्या कवायतीबद्दल विचारविनिमय, २९ जाने. १८२७ (६६) ; गव्हर्नर यास दसऱ्याचा पोषाख, १९ फेब्रु. १८२७ (७७) ; बाळाजीपंत नातू यांस नवी व जुनी कामें दाखवण्याचा कार्यक्रम, २७ फेब्रु. १८२७ (८३) ; लष्करी व शहरी लोकांसंबंधात कायदे बनविण्याची कर्णेल यांस सूचना, २७ फेब्रु. १८२७ (८४) ; बाळाजीपंत यांनी पंधरा हजाराची लबाडी केल्याची एल्फिन्स्टन याची खात्री, ३ मार्च १८२७ (८६) ; हिंदुस्थानची माहिती असलेली पुस्तके विलायतेहून ग्रँटमार्फत रवाना, १४ मार्च १८२७ (९३) ; साहेब लोक सरहद्दीचे बावटे रोवण्यास येत असल्याची जावळीच्या मामलेदाराकडून माहिती, २५ मार्च १८२७ (१०२) ; टांकसाळीबद्दल समसेन यास विचारणा, १५ एप्रिल १८२७ (११९) ; चोर प्रकरणांबाबतच्या जाहीरनाम्यासंबंधी सचिव यांचेकडून पत्र, ३ मे १८२७ (१२९) ; मुंबई येथील बादशाही अदालतीच्या साहेबाचे व एल्फिन्स्टन याचे भांडण असल्याबाबत पुण्यांत चर्चा, २४ मे १८२७ (१४६) ; प्रकृती अस्वास्थ्य हया कारणाने मराठे लोकांची कवायतीस गैरहजेरी, २६ मे १८२७ (१४७) ; आप्पासाहेबांच्या वागणुकीसंबंधी कलमे, ३० मे १८२७ (१५१–१५३) ; वकीलीचे कामावर रॉबिन्सन याची नेमणूक, १९ जून १८२७ (१७५) ; पंतसचिव यांच्या दत्तकाविषई कलमांची यादी, २५ जून १८२७ (१७९), २६ जुलै १८२७ (२१५) ; वतनपत्रांच्या ठरावासंबंधी, २६ जून १८२७ (१८१) ; खटाव पेटचाविषयी आदम साहेबांशी चर्चा, २४ जुलै १८२७ (२१२) ; संत्री लोकांचा बंदोबस्त ठेवण्याबद्दल कर्णेल यास सूचना, १७ ऑगस्ट १८२७ (२३५) ; कंपनी सरकारांतून बाजीराव यास मुलुख देण्याचा विचार, १७ ऑगस्ट १८२७ (२३६) ; चोऱ्या करणाऱ्यांस फांशीची शिक्षा देण्याचा हुकूम, २९ ऑगस्ट १८२७ (२५१) ; सातारा मुक्कामी चाकरीस हजर राहण्याचा सचिवांना इशारा, ३ सप्टें. १८२७ (२५७) ; कोल्हापूर येथे पलटणे रवाना, ८ सप्टें. १८२७ (२६९) ; बाल्याबास सेनापतीपद व चिटणीस यास सुमंतपद देण्याचा विचार, ११ सप्टें. १८२७ (२७१) ; मिरज किल्ल्याची मामलत कंपनी सरकारकडे देण्याचा विचार, १७ सप्टें. १८२७ (२७६).

## दप्तर क्रमांक ४०, पुडके क्रमांक ३—चालू

**राज्य सुधारणा :**—इंग्रज लोकांसाठीं बंगले बांधण्याबाबत महाराजांस विचारणा, ८ मार्च १८२७ (८९) ; महाबळेश्वर येथे बंगले बांधण्याची सूचना, १९ मार्च १८२७ (९७).

---

## पुडके क्रमांक ४

पृष्ठ सं. १-२७८, पत्र क्रमांक (१९११७), इ. स. ३० सप्टें. १८२७ ते १७ ऑक्टो. १८२८

### (प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**आर्थिक :** जमाबंदी, राज्यांतर्गत व्यवहार, न्याय, ९ ऑक्टो. १८२७ (११-१५) ; सरंजामाच्या वसुलाती, ४ नोव्हें. १८२७ (४६) ; सचिवांस खर्च वगैरेबाबत सादर केलेली यादी, २३ नोव्हें. १८२७ (६५-६८) ; रामोशांची धाड, जमाबंदीची वसुली, १६ डिसें. १८२७ (९१) ; मामलेदारांस ऐवज देण्याचे नियम, २५ जाने. १८२८ (१२५) ; बजाबा नाईक याचा भुसार जकात घेण्याचा उपद्व्याप, २ फेब्रु. १८२८ (१३२) ; भुसार जकात घेण्याचा महाराजांचा सल्ला, ७ फेब्रु. १८२८ (१३६) ; आर्थिक व्यवहारांचा रॉबिन्सन तर्फे उलगडा, २१ मार्च १८२८ (१८१) ; खर्चावर कडक नियंत्रण ठेवण्याचा गव्हर्नर मालकम याचा महाराजांना सल्ला, ३ मे १८२८ (२१७).

**किरकोळ :** सेनापती, सुमंत, सरलष्कर वगैरे लोकांना दिलेल्या सनद्यांचा तपशील, ३० सप्टें. १८२७ (१-४) ; सचिवांना भेटावयास येणाऱ्या लोकांची यादी, १५ नोव्हें. १८२७ (५७) ; बाळाजीपंत नातू, रॉबिन्सन वगैरे लोकांस महाराजाकडून मेवा-मिठाई, २ डिसें. १८२७ (७९) ; विलायतेतील बादशहाच्या मुख्य दिवाणाचा मृत्यू, १२ डिसें. १८२७ (८८) ; प्रतिनिधींकडील सकवारबाईचा समाचार, ४ जाने. १८२८ (११०) ; संग्राहच ग्रंथांची नावे सादर करण्याबाबत, १४ जाने. १८२८ (११९) ; जमिनीसंबंधात जाहीरनामे, १७ जाने. १८२८ (१२२) ; रेसिडेन्ट, ब्रीक याच्या विलायतेकडील गमनाचा वृत्तांत, १२ फेब्रु. १८२८ (१४१) ; महाबळेश्वर येथे इंग्लिश शिपायांच्या उन्हाळी छावण्या, १८ फेब्रु. १८२८ (१४६) ; महाराजांना मुजरे करण्याची प्रथा, २३ एप्रिल १८२८ (२०७) ; वृक्षारोपण, २७ मे १८२८ (२४६).

**खाजगी :** महाराजांच्या उदेपूर येथील जातीधर्मासंबंधी, २१ ऑक्टो. १८२७ (२८) ; निगडीकर गोसावी बंधूस द्यावयाचा मान, २३ ऑक्टो. १८२७ (३०) ; एलफिन्स्टन याची महाराजांवरील मेहेरबानी, २३ नोव्हें. १८२७ (६३) ; शाहू महाराजांच्या वेळेस केलेल्या चाकरीची जाणीव ठेवण्याबाबत चाकराची विनंती, २७ फेब्रु. १८२८ (१५९) ; चिंतामणराव पटवर्धन यांच्या लग्नासंबंधात, ४ मार्च १८२८ (१६४) ; शिवाजी महाराजांच्या बखरीसंबंधी महाराजांचे मत, ३१ मार्च १८२८ (१९०) ; सिंहगडावरील राजाराम महाराजांचे स्थान, ४ एप्रिल १८२८ (१९४) ; पहिले बाजीराव पेशवे व शाहू महाराज यांचे एकमेकांशी असलेले संबंध, ५ मे १८२८ (२२१) ; महाराजांच्या शंकांना उत्तर देण्याचा गव्हर्नरचा विचार, ६ मे १८२८ (२२७) ; महाराजांनी केलेल्या दैनंदिन कामाचा आढावा, १२ ऑक्टो. १८२८ (२७४).

**छत्रपती व रेसिडेंट :** सचिव बंड प्रकरणी परस्पर पुण्यास पत्रव्यवहार करण्याबाबत इंग्रजांना महाराजांची परवानगी, ७ डिसें. १८२७ (८४) ; महाराजांच्या स्वारीबरोबर गव्हर्नर, रेसिडेंट वगैरेंनी वागण्याची वहिवाट, २३ मार्च १८२८ (१८५) ; छत्रपतींचे संरक्षण व राज्यकारभार पेशव्यांकडे असल्यावेळी वेदोक्त पद्धतीनेच राज्याभिषेक झाल्याचा छत्रपती महाराजांचा दावा, ११ जुलै १८२८ (१८९).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :**

**इनाम, जहागिर :** १३९, ३०४, ३०५.

**खाजगी :** ७, ९, २५, ३५-३६, ५८, ५९, ६०, ७१, ७२, ७६, ८२, ८६, ९०, १०८, १२३-१२४, १२७, १३१ १३४-१३५, १३८, १४३, १४७-१४८, १५२-१५४, १६०, १६५, १६७-१६८, १७१, १७४, १८६-१८९, १९५-२०२, २०४-२०६, २१०-२१४, २१८-२२६, २३१-२३६,

खाजगी : चालू—

२४०–२४५, २४७–२४९, २५१–२७२, २७७–२८०, २८२–२८४, २८६–२८८, २९१–२९४, २९७–२९८, ३०६–३११, ३१५–३२१, ३२४–३२८, ३३७, ३३९–३६१, ३६४, ३७०–३७२.

गुन्हेगारी : २०, १११, ११८, १२८, १४९, १५५-१५६, १७३, २०३.

जकात : १२६.

जमाबंदी : ४३, ४५, ४९, ५०, ८५, १३०.

जाहीरनामा : ३१३-३१४.

ताकीद : १५८.

धार्मिक : ४४, ८०, १०३, १५१.

न्याय : १०, २१-२२, ७८, १०६, १९२, २७६.

राजकारण : २६, ४२, ७०, ९३, १०९, १४२, २०९, २२८-२२९, ३०१-३०२.

राज्यकारभार : १६-१७, ३४, ३९-४०, ४७–५६, ६९, ७३, ७४, ८३, ८७, ८९, ९८, ९९, १०७, १४०, १६१–१६३, १६६, १७५, १७८–१८०, १८२–१८४, २२२, २२४-२२५, २३७–२३९, २९९-३००, ३३०-३३१, ३३४-३३५, ३६३.

सामाजिक : ३२, ६१, १०२, ११३, १२१, १३३, १४५.

हिशेब : ३७, ६२, १६९, २२३.

जहागिर : बाळचात्रा, ग्रँट, रॉबिन्सन व महाराज यांच्यांत जहागिरदारांना द्यावयाच्या यादीसंबंधी चर्चा, ११ ऑक्टो. १८२७ (१८); जानराव नाईक निंबाळकर यांची जहागिरी, २७ ऑक्टो. १८२७ (३८); पाहुणा बंडात सामील म्हणून इनामदाराच्या वतन वगैरेची जप्ती, १६ जाने. १८२८ (१२०); देशमुख, देशपांडे यांना नख्त नेमणुकऐवजी पड जमिनी देऊन त्या उपयोगात आणण्याची कल्पना, २ जून १८२८ (२५०).

धार्मिक : प्रभूंकडील संबंधांबाबत वाळीत टाकण्याची प्रथा, सोनार व ब्राह्मण यामधील रितीरिवाजाबाबत तंटा, ३ व ४ डिसें. १८२७ (८१); जातीधर्मसंबंधी महाराजांचे विचार, २५ डिसें. १८२७ (१०१); जातीवादापासून सरकार अलिप्त असल्याचा महाराजांचा निर्वाळा, १७ फेब्रु. १८२८ (१४४); आपत्‌धर्म, नीती व्यवहार वगैरे गोष्टींचे पालन, १८ फेब्रु. १८२८ (१४६); गुजर ज्ञातीतील व्यवहारधर्माचे विवेचन, २३ फेब्रु. १८२८ (१५०); धर्म भिन्नतेमुळे इराणचा बादशहा व इंग्रज यामध्ये युद्ध, १० मार्च १८२८ (१७०); प्रभू, सोनार वगैरे ज्ञातीसंबंधीचा वाद, १३ जुलै १८२८ (२९०); प्रभू जाती प्रकरणी कंपनी सरकारकडे पाठविलेले शिवाजी महाराज ते शाहू महाराज यांचे वेळचे दाखले अस्सल नसल्याचा महाराजांचा दावा, रॉबिनसन याच्याशी विचारविनिमय, १९ जुलै १८२८ (२९५-२९६); शंकराचार्यांच्या कारकुनांची दक्षिणादानाबाबत फलटणमधील बळजबरी, २४ जुलै १८२८(३०३); नागपूरमध्ये मराठा जातीची सभा, १ ऑगस्ट १८२८ (३१२); क्षात्र धर्माविषयी विचारदर्शन, १४ ऑगस्ट १८२८ (३२२); क्षत्रियांना श्रावणी करण्याच्या अधिकारासंबंधी शास्त्र विचार, १५ ऑगस्ट १८२८ (३२३); वेदोक्त कर्म करण्यास परवानगी देण्याबाबत ठाकूरदास या हिंदुस्थानी ब्राह्मणाची विनंती, २१ ऑगस्ट १८२८ (३२९); क्षात्रधर्म कोणत्या वेदाचे आधारे चालवावा याविषई विचार, २७ ऑगस्ट १८२८ (३३६); प्रभू जातीचे खटल्याबाबत राघवाचार्य व बाळाजी नीळकंठ शास्त्री असे दोन पक्ष, ४ ऑक्टो. १८२८(३६२); प्रभूप्रकरणी वाई पेट्याचे मामलेदारास दिलेली उत्तरे, ११ ऑक्टो. १८२८(३७३).

न्याय : करंडा गांवच्या इनामासंबंधी न्याय, १४ ऑक्टो. १८२७ (१९); चोरी करणारास फाशी किंवा कडक शासन करण्याची योजना, १९ डिसें. १८२७(९६); चोरांना शिक्षेत माफी, २२ डिसें. १८२७ (१००); गायकवाड याजकडील कर्जासंबंधी इंग्रजांकडे फिर्याद, १० मार्च १८२८ (१७०); पत्रांवर खोटी शिक्कामोर्तब केल्याचा प्रभू व ब्राह्मणांवर संशय, १६ मार्च १८२८ (१७७).

**दप्तर क्रमांक ४०, पुडके क्रमांक ४—चालू**

**राजकीय :** कोणत्याही नेमणुका मंजूर करण्यासाठी महाराजांच्या परवानगीची आवश्यकता, ६ ऑक्टो. १८२७(८) ; कोल्हापुरकरांना इंग्रजांनी कपटाने कैद केल्यामुळे जनतेत असंतोष, २३ ऑक्टो. १८२७(३१) ; देशमुख दप्तरांत असलेल्या प्रतिनिधी व बापू गोखले यांच्या कागदपत्रांची मागणी, ३० ऑक्टो. १८२७(४१) ; मराठे लोकांना राज्यांत कमी मान असल्याची तक्रार, १२ नोव्हें. १८२७(५३) ; स्वहित संरक्षणासाठीं मराठे लोकांचा प्रयत्न, १३ नोव्हें. १८२७ (५४) ; सचीव प्रकरणीं कलमवार चर्चा, १५ नोव्हें. १८२७ (५५) ; बाजीराव येणार असल्याच्या वदंतेचा इन्कार, २३ नोव्हें. १८२७(६४) ; बंडवाल्यास आश्रय न देण्याची तजवीज, १ डिसें. १८२७(७७) ; कंपनी सरकारचे नोकर किंवा भगवे निशाण बाळगणाऱ्यानाच वरदीवर सोडण्याचा हुकूम, १७ डिसेंबर १८२७(९२) ; इंग्रज वकीलावर लांच घेतल्याचा आरोप, १९ डिसें. १८२७(९५) ; पेशव्यांवर राज्य घालविल्याचा आरोप, १६ मार्च १८२८ (१७६) ; इराण व रुसवाले टोपीकर यांजकडील खबर, २ एप्रिल १८२८(१९१) ; बाजीराव पेशवे यांजकडून इंग्रजांचे द्यावयाचे कर्ज, १ मे १८२८(२१५) ; रुमचा बादशहा व एल्फिन्स्टन यांची भेट, ३ मे १८२८(२१६) ; करवीरकरांच्या वागणुकीबाबत इंग्रजांची नाखुषी, ४ मे १८२८ (२१९) ; करवीरकरांशी बोलणीं करण्याकरितां योग्य माणसाची निवड, ५ मे १८२८ (२२०) ; माधवराव मुन्शींच्या चुलत्याने हिंदुस्थानची माहिती लिहिल्याबद्दल त्यास दिलेला मुशाहिरा, ७ ऑक्टो. १८२८ (३६९).

**राज्यकारभार :** सेख मीरा याचेशी केलेल्या करारयादी, ३ ऑक्टो. १८२७ (५) ; राज्यकारभाराबाबत रॉबिनसनच्या सूचना, ४ ऑक्टो. १८२७(६) ; इनाम जमिनी व पेट्याचा कारभार यांचा बंदोबस्त, १९ ऑक्टो. १८२७ (२३-२४) ; कोल्हापूरचे बंड, २० ऑक्टो. १८२७ (२७) ; नवे गव्हर्नर जॉन मालकम यांची नवी कलमें, १० नोव्हें. १८२७ (५१-५२) ; चोरांचा बंदोबस्त न झाल्यास साहोत्रा बंद करण्याची सचिवांस धमकी, २९ नोव्हें. १८२७ (७५) ; जत व करजगी येथील रस्ते दुरुस्त करण्याबाबतचे हुकूम, ९ जाने. १८२८ (११२) ; इंग्रज सरकारनी केलेल्या वंशावळीसंबंधी याद्या, १२ जाने. १८२८ (११६-११७) ; बेरड जातीच्या लोकांना नोकरीतून मुक्त करण्याबाबत रॉबिनसन याचा हुकूम, १ फेब्रु. १८२८ (१२९) ; राजाने कसे वागावे याविषई मार्गदर्शन, १३ मार्च १८२८(१७२).

**सामाजिक :** मराठ्यांच्या मुलांना शाळांकडून मिळणारी वागणूक, २१ डिसें. १८२७ (९७) ; ग्रँटकडून घोरपडे यांच्या भांडणाबाबत पंचाईत, २९ डिसें. १८२७ (१०५) ; उमाजी व भुजाजी नाईक रामोशी यांचे धमकीचे जाहीरनामे, पाटील कुलकर्णी, देशमुख, देशपांडे वगैरे लोकांना कांही व्यवहार्य सूचना, ९ जाने. १८२८ (११४-११५) ; दत्तक घेण्यासंबंधीचा रीतिरिवाज, ७ फेब्रु. १८२८ (१३७), गायकवाड व शिर्के यांजमधील सोयरीक, व नाना फडणिस याच्या स्त्रीने घेतलेल्या दत्तकासंबंधी, ३ एप्रिल १८२८(१९३) ; शिर्के घराण्यांतील लग्नसंबंध, २३ एप्रिल १८२८(२०८) ; ब्राह्मणजातीच्या निष्ठेबद्दल संशय व्यक्त करणारी बोलणी, ९ मे १८२८(२३०) ; रामराव गुजर व अमरसिंग शिर्के यांच्यातील सोयरीक व त्याबाबत शास्त्रार्थ विचार, २५ जून १८२८ (२७३), (२७५) ; उमाजी नाईक रामोशी याचा बंदोबस्त करण्याची मागणी, ६ जुलै १८२८ (२८५) ; करवीरकर प्रकरण तुर्त बंद करण्याची कंपनी सरकारची इच्छा, १९ जुलै १८२८ (२९६) ; कात्रे यांजकडून खोटे इनामपत्र सादर, ५ ऑक्टो. १८२८(३६७).

---

**टीप** :—*प्रत्येक नोंदीच्या तारखेची नोंद न करतां पहिल्या नोंदीच्या तारखेपासून शेवटच्या नोंदीच्या तारखेपर्यंतच्या कालखंडाची नोंद केली आहे.

# दप्तर क्रमांक ४१

## पुडके क्रमांक १ ते ४

## पुडके क्रमांक १

पत्र क्र. १९११८, पृष्ठ क्रमांक १ ते ४१२, इ. स. १८२८-१८२९

**( प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी १८ ऑक्टोबर १८२८ ते ६ ऑक्टोबर १८२९ अखेर.)**

**आर्थिक :** शहाजी भोसले अक्कलकोटकर यांचा वेहडा निश्चित केला त्याचा तपशील, २३ नोव्हेंबर १८२८ (४५-४९); पंढरपूर ते अक्कलकोट यामधील कंपनी सरकारच्या गांवांचा 'मोबदला' करण्या-विषयी, ५ मार्च १८२९ (१४२); स्वस्ताईमुळे जमाबंदीत नुकसानी येण्याचा संभव, १ जून १८२९ (२३१); दौलतीकडील जमाखर्च व शाळेकडील नेमणूक वगैरे संबंधीचा तपशील, ५ जून १८२९ (२३९); कंपनी सरकारच्या राज्यांतील जहागिरदारांच्या कर्जाची वसुली करण्याबाबत योजना, ३ ऑक्टोबर १८२९ (४०७).

**किरकोळ :** अक्कलकोटकर यांनी मेजवानी दिली त्याचा तपशील, २८ ऑक्टोबर १८२८ (८-९); अक्कलकोटकर शहाजी भोसले यांना दिलेल्या सनग्यांचा तपशील, २९ ऑक्टोबर १८२८ (११); नाना फडणीस यांच्या गुरुच्या कौशल्याची गोष्ट, २२ नोव्हेंबर १८२८ (३७); बळवंतराव भोसले सेनापती याजकडून कवायती लोकांचा गुणगौरव, २५ नोव्हेंबर १८२८ (५०-५३); विज्यापूरमधील शापूर तलावाच्या दुरुस्तीसंबंधी, ५ जानेवारी १८२९ (८७); औरंगजेबाचे मुलीच्या कबरखर्चाकरिता दिलेल्या गावाची मोगलाई सरहद्देत वाटणी, ३० जानेवारी १८२९ (११२); लष्करी कवायत पहाण्याच्या बंदीसंबंधीचा खुलासा, २४ एप्रिल १८२९ (१८५); हिंदुस्थानांत घडविलेला नांगर व कुलप इंग्रजांस फार पसंत असल्याबाबत ब्रीकचा शेरा, २ मे १८२९ (१९०); महाबळेश्वरनजीक गव्हर्नर मालकम यास जागा देण्यासंबंधी, १४ मे १८२९ (२०५); पुण्याच्या परिसरांतील घाट व रस्ते बांधणी व दुरुस्ती, १२ जून १८२९ (२५२); रॉबिनसन याजकडून शाळा तपासणी, ३ ऑगस्ट १८२९ (३३३); हैद्राबाद येथे असलेल्या हत्यारांचा तपशील, ८ ऑगस्ट १८२९ (३३९); पंढरपूर येथील कापडाचा व्यापार, ७ सप्टेंबर १८२९ (३७५).

**खाजगी :** गव्हर्नर (मालकम) कडून महाराजांची स्तुती, ७ नोव्हेंबर १८२८ (२३); एल्फिन्स्टन रुमची लढाई पहावयास थांबले होते असे मालकम याजकडून वृत्त, ९ नोव्हेंबर १८२८ (२५); महाराजांच्या नातेवाईकांनी योग्य त्या मानाने रहाण्याबाबत, २८ फेब्रुवारी १८२९ (१३५); ऐवजाच्या देण्याघेण्यासंबंधी सूचना, २३ मार्च १८२९ (१५६); छत्रपती भोसले घराण्याचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न, २५ मार्च १८२९ (१५९); एल्फिन्स्टनचा सत्कार वगैरे केल्याबद्दल महाराजांची स्तुती, ८ जुलै १८२९ (३०५); धुंदा नायकीणीस सेवेबद्दल दागिन्यांच्या रुपाने मोबदला, १८ जुलै १८२९ (३१८).

**छत्रपती व रेसिडेंट :** नवीन मुलुख व पैसा मिळत नसल्याबद्दल विलायत सरकार नाराज असल्याचे मालकम साहेबाचे कथन, २२ मे १८२९ (२१४); इंग्रजांचे राज्य न्यायाची बूज ठेऊनच चालले असल्याबाबतचा मालकमचा दावा, २३ मे १८२९ (२१५); खर्चावरील नियंत्रणाची सूचना, १२ जून १८२९ (२४८); महाराजांच्या शिक्षणविषयक धोरणामुळे महाराजांचा ब्रिटनमध्ये गौरव, रीतसर जमाबंदी व राज्याचे कल्याण हाच राजधर्म असा विचार, ७ जुलै १८२९ (२९९-३०१).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :**—(खालील पृष्ठांची १८ ऑक्टोबर १८२८ ते ६ ऑक्टोबर १८२९ अशी तारीख आहे).

**दप्तर क्रमांक ४१, पुडके क्रमांक १—चालू**

**इनाम :** ९५.

**खाजगी :** १, ३-७, १६, १८, २०-२१, २८, ३३-३६, ५४-५६, ५८-५९, ६२, ६४-६७, ७१-७२, ७७-८१, ८५-८६, ९०-९३, ९९-१११, ११३-११६, १२०, १२४, १२९-१३२, १४९-१५५, १६१, १६३-१६९, १७१, १७३-१८४, १८६-१८८, १९२-१९५, २००, २०२, २०४, २०६-२११, २१७-२२०, २२४-२३०, २३८, २४०-२४३, २४५-२४६, २५०-२५१, २५६-२६०, २६२-२६७, ३०२-३०४, ३०९, ३१०, ३१२-३१६, ३१९-३२१, ३२३-३२७, ३२९-३३२, ३३४, ३३७-३३८, ३४०-३४७, ३४९-३५२, ३५४-३५६, ३५८.

**गुन्हेगारी :** १०, ११८, १४१, २०१.

**धार्मिक :** ६९, १२५, १९०.

**नेमणूक :** १९.

**राजकारण :** १४, २९, ३१, १२७-१२८, १३३, १३४-१३५, ३०६-३०८,

**राज्यकारभार :** १२, २६, ३२, ३८-४४, ६१, ७३-७६, ८२-८४, ९६-९८, १४१, १४३-१४६, १५७-१५८, १८९, १९१, १९८, २१३, २१६, २२२, २३४-२३६, २४९, २५३-२५४, २७४-२९०, ३६१-३७४, ३७६-३८८, ३९७-३९८.

**सामाजिक :** २३२.

**हिशेब :** २२४, २४७, २६८, २७३.

**धार्मिक :** कोकणस्थ ब्राह्मण, यजुर्वेदी व प्रभू या जातींतील वैमनस्य, १९ ऑक्टोबर १८२८ (२); वाई मुक्कामी शंकराचार्य यांचे आगमन, ३१ ऑक्टोबर १८२८(१७); शंकराचार्यांना पंक्तीत घेण्याविषयी कर्नाटकांतील कोकणस्थ ब्राह्मणांच्यात मतभेद, ४ डिसेंबर १८२८ (६३); ब्राह्मणांना त्यांच्या चुकीबद्दल शंकराचार्यांनी शिक्षा करावी अशी विनंती, ९ डिसेंबर १८२८(६८); धार्मिक बाबतीत शंकराचार्यांच्या सत्याची आवश्यकता, ११ डिसेंबर १८२८(७०); जातीद्वेष कमी करण्याबाबतचा इंग्रजांचा प्रयत्न, ६ फेब्रुवारी १८२९(११७); राज्याच्या अभिष्टासाठी देवीची पूजा करण्याची छत्रपती शिवाजी महाराजांपासून प्रथा, ८ मे १८२९(१९७); यज्ञ करणाऱ्या सखाराम दीक्षित यांस तीन हजार रुपये बक्षीस, ८ जून १८२९ (२४४); चाफळकर स्वामी यांच्या संस्थानची पुढील तजवीज, २५ जून १८२९(२६९).

**राजकीय :** अक्कलकोटकर भोसले याजकडे आपल्या तर्फेची माणसे नेमण्याचा महाराजांचा इरादा, २९ ऑक्टोबर १८२८(१३); ब्राह्मण जातीशी कंपनी सरकारने सर्व व्यवहार जपून करावे अशी महाराजांची विनंती, २९ ऑक्टोबर १८२८(१५); गव्हर्नर मालकम व महाराज यांची सातारा मुक्कामी भेट व मुलाखत, ६ नोव्हेंबर १८२८(२२); बाजीराव पेशवे यांचा पाडाव करण्यास महाराजांनी स्वतःहून इंग्रजांना मदत केल्याबाबतची लोकवार्ता, १० नोव्हेंबर १८२८(२७); कंपनी सरकारला खुष करण्याकरिता बाळाजीपंत नातूचे मुलाचा सत्कार, १४ नोव्हेंबर १८२८ (३०); विजापूर येथे कोट बांधण्याविषयी, ९ जानेवारी १८२९ (८८); गोवेकर फिरंगी व इंग्रज यांमध्ये टिपूचा बावटा घेण्यासंबंधी चर्चा, १० जानेवारी १८२९ (८९); वॉर्डन व सॅमसन यांची सिंहगड किल्यास भेट, १६ फेब्रुवारी १८२९ (१२६); बाजीराव रघुनाथ यांस वेड लागल्याचा बोलवा, १६ जून १८२९(२५५); रुम व रुस यांच्या लढाईतील इंग्रजांचा पवित्रा, २३ जुलै १८२९(३२२); गोवळकोंड्यानजीक अरब व इंग्रज यांची किरकोळ चकमक, २९ जुलै १८२९(३२८); पेशवे बाजीराव रघुनाथ याजकडील लोकास थारा न देण्याबाबत, २१ ऑगस्ट १८२९(३५३); राज्य कां बुडाले त्याची मिमांसा, २७ ऑगस्ट १८२९(३६०); रुस व इराण यामधील लढाई, २६ सप्टेंबर १८२९(३९९).

**राज्यकारभार :** जहाजाचे इंजिनाची माहिती घेण्याकरितां राणजी नाईक याच्या मुलास मुंबईस पाठविण्याची योजना, ८ नोव्हेंबर १८२८(२४); मालकम, एल्फिन्स्टन व ग्रँट यांचेकडे सरकारी कामांचा

**राज्यकारभार :** चालू—

मसुदा पाठविण्याकरिता राबिन्सन याजकडे यादी रवाना, १ डिसेंबर १८२८(६०) ; राज्य व्यवहारांत इंग्रजी भाषेचे पालन, २४ फेब्रुवारी १८२९(११३) ; कोऱ्या कागदावर शिक्के करून मग त्यावर मजकूर लिहिणे धोकादायक असे मत, २७ फेब्रुवारी १८२९(१३४-१३५) ; अलिज्या बहाद्दर शिंदे याच्या खंडाळे हृचा गांवाची जप्ती, ८ एप्रिल १८२९(१७०) ; प्रतापगड किल्ला शिवाजी महाराजांनी बांधला यासंबंधीचा प्रतापगडावरील पुरावा, २१ मे १८२९(२१२) ; दस्तूर माफक वहिवाट असलेल्या इनाम जमिनी दुसऱ्यास देता येत नसल्यासंबंधीचा तंटा, २७ मे १८२९(२२१) ; प्रतिनिधीकडील जमिनी, प्रतिनिधीकडील झडती वगैरे, १ जून १८२९(२३३) ; सचिवांच्या जिल्ह्यांतील चोरीच्या बंदोबस्ताची योग्य दखल घेण्याबाबत सचिवास कडक खलिता, २२ जून १८२९(२६१) ; तोफ निशाणीचा सराव करण्यासाठी राख व चिंच मिश्रित गोळ्यांचा उपयोग, २७ सप्टेंबर १८२९(४००).

**सामाजिक :**

पारघाटाचा रस्ता व कोयना नदीवरील लाकडी पूल यासंबंधी रॉबिन्सन साहेबांशी बोलणी, महाराजांस मुजरा करण्याच्या वादासंबंधी, ७ फेब्रुवारी १८२९(११९) ; चोरीच्या उपद्रवाचा योग्य प्रकारे बंदोबस्त करण्याबाबत रॉबिनसन याचे पत्र, ११ मार्च १८२९ (१४७) ; ब्राह्मणांचे घरी इंग्रजांस होणाऱ्या मेजवानीबाबत चर्चा, २९ मार्च १८२९ (१६२) ; संस्कृत वगैरे शिक्षण व तिरंदाजी वगैरे मर्दानी खेळ शिकून शिवाय इंग्रजी व पारशी शिकण्याचा कांही मुलांचा प्रयत्न, १० एप्रिल १८२९(१७२) ; सजणसिंहजी महाराणा याकडील वखरीवा सूर्यवंशीत्व सिद्ध करण्याकडे उपयोग करून घेण्याचा विचार, ७ मे १८२९(१९६) ; कराड पेटचांतील रयतेची हलाखी, १० मे १८२९ (१९९) ; वाई पेट्यांतील जमिनीविषयी उमाजी नाईक रामोशी याचा वाद, १ जून १८२९ (२३७) ; सचिवाच्या इलाख्यातील चोरांचा बंदोबस्त, ३० जून १८२९ (२९१) ; राजमंडलांतील सोयरे लोकांस मुन्जी न करण्याचे बंधन नसल्याबद्दल रामशास्त्री यांचा दाखला, १० जुलै १८२९(३११) ; मुलांना शिक्षण देण्याची खटपट, १७ जुल १८२९(३१७) ; छपाई विद्या शिकण्यास व जान ज्याविस याजकडून इंजिनिअरिंग विद्या शिकण्यास मुंबईस विद्यार्थी पाठविण्याची योजना, १५ ऑगस्ट १८२९ (३४८) ; मंदी रोखण्याकरिता सैन्य ठेवून खर्च वाढविण्याची सूचना, २४ ऑगस्ट १८२९(३५७) ; बाराची दारू करणे, तोफ निशाणी वगैरे विद्या शिकविणे व निरनिराळे हुद्दे देण्याबाबत इंग्रजांवा मराठे मंडळीविषयीचा आपपरभाव, २६ ऑगस्ट १८२९(३५९) ; महाराष्ट्रातील शेती व साखर भटट्या व्यवसायांत इंग्रजांचा शिरकाव, २५ सप्टेंबर १८२९(३९६).

---

पुडके क्रमांक २

पत्र क्र. १९११९, पृष्ठ क्र. १ ते ५७४, इ. स. १८२९-३०

**(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी ७ ऑक्टोबर १८२९ ते २६ सप्टेंबर १८३० अखेर.)**

**आर्थिक :**

मलकण याने जहागिरदाराकडील दत्तक वारसाचा सरंजाम कमी करून सरकारी उत्पन्नात केलेली वाढ, २१ ऑक्टो. १८२९ (२८) ; साताऱ्यापासून कातवडीपर्यंत व कोयनेपासून तीवऱ्यांपर्यंत वगैरे रस्ते तयार करण्यास आलेला खर्च, १८ एप्रिल १८३० (२९६) ; त्रिंबकराव दाभाडे यांची तळेगाव येथील वतनदारी वसुली, १९ मे १८३० (३४५) ; फौजेसाठी लागणारा दारुगोळा व रोजमुरा याचा खर्च, ७ जुलै १८३० (४५१) ; लढाईत ठार झालेल्यांना पेन्शन, २४ सप्टें. १८३० (५७१).

**किरकोळ :**

चाफळकर स्वामीस निरोप, १६ ऑक्टो. १८२९(२०) ; मलकण याचे पुण्याहून बडोदा येथे गमन, ८ नोव्हें. १८२९ (५४) ; कोकण प्रांती चोरांच्या उपद्रवामुळे इंग्रज लोकांची जहाजात निंदा, ९ मार्च १८३० (२२३) ; खोट्या स्वाक्षऱ्या करणारांचा बंदोबस्त, १८ मार्च १८३० (२३८) ;

**दप्तर क्रमांक ४१, पुडके क्रमांक २---चालू**

**किरकोळ :** चालू--

पंढरपूर येथील देवाच्या दागिन्याची व्यवस्था, ३० मार्च १८३० (**२६१**); पावसाच्या नक्षत्रांची माहिती, २८ एप्रिल १८३० (**३१०**); प्रयागाहून चतरसिंग याचे आगमन, २२ मे १८३० (**३४९**); पंढरपूरच्या बडव्यांचा अधिकार, १३ जून १८३० (**३९२**); पुण्यांत शेणवी ब्राह्मणांनी केलेली देवाची स्थापना, १९ जून १८३० (**४०४**); आप्पासाहेबाची गैरवर्तणूक, २४ ऑगस्ट १८३० (**५३४**).

**खाजगी (छत्रपती):** पदरच्या मंडळींना गावें, जमिनी व बक्षिसे यांच्या देणग्या, १० ऑक्टो. १८२९ (**६ ते ११**); व्यंकटराव भास्कर यास स्वामीसंनिध रहाण्याची आज्ञा, ४ नोव्हें. १८२९ (**४७**); माईसाहेब यांस आजारपणामुळे मृत्यू, २९ डिसें. १८२९ (**१२१**); बाजीराव पळून गेल्याबद्दलची बातमी, २८ जाने. १८३० (**१७२**); पाचवड गाव बाळाजी नारायण नातू यांस इनाम, ५ फेब्रु. १८३० (**१८२**); पेशवे कारकीर्दीचे पूर्वी व पेशव्यांच्या वेळेस असलेल्या पट्ट्याची (इनाम पट्टी, कर्जपट्टी वगैरे) माहिती, १ एप्रिल १८३० (**२७१**); मुलकी, अदालत, इन्साफ वगैरे कामाबाबत दिलेले शिफारसपत्र, २६ जून १८३० (**४१७**); शहाजी राजे भोसले अक्कलकोटकर व महाराज छत्रपती यांचा तंटा, २६ ऑगस्ट १८३० (**५४०**); आप्पासाहेबास आजारपण आल्यामुळे श्री देवीस शतचंडीचा नवस, ७ सप्टेंबर १८३० (**५५५**).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :** (खालील पृष्ठांची तारीख ७ ऑक्टोबर १८२९ ते २६ सप्टेंबर १८३० अशी आहे)

**आर्थिक :** २२, २३, ३३, ३४, ८२, १२७, १३४, १८३ ते १८६, २०३, २१०, २११, २२८, २२९, २५१, ३३०, ३३२, ३४१, ३६०, ३७०, ३९३, ४४१, ५०४, ५१६, ५५३.

**इनाम, सरंजाम, जहागिरी वगैरे :** ४, २७२, २७३, ३२५, ३३९, ४०९, ४५५, ५४७.

**खाजगी :** १, ५, १५, १६ ते १९, २१, २५, २६, ३०, ३५, ३९, ४१, ४५, ५५, ६१ ते ६४, ६८, ७०, ७१, ७५, ७८, ८०, ८१, ८४, ८९, ९२, ९३, ९४, ९९, १०१, १०४, १०७, १०९ ते १११, ११३, ११७, ११८, १२५, १३१, १३३, १३५, १३६, १३९, १४०, १४६, १४७, १४८, १५५, १५९, १६१, १६३, १६५, १६८, १६९, १७५, १७८, १७९, १८७, १९१, १९५ ते १९९, २०५, २०७, २१२, २१४, २१६, २१७ ते २२०, २२६, २३१, २३३ ते २४३, २४६, २५०, २५७, २७४, २७५, २७६, २७७, २८२ ते २८४, २८६, २८७, २८८, २८९, २९३, २९५, २९७, २९८, २९९, ३०१, ३०६, ३०७, ३०८, ३०९, ३१३, ३१८, ३२० ते ३२३, ३२७, ३३१, ३३५, ३३७, ३४०, ३४२, ३४३, ३५३, ३५४, ३५५, ३५९, ३६२, ३६३, ३६९, ३७१, ३८२, ३८३, ३८६, ३८७, ३९४, ३९५, ३९८ ते ४०१, ४०३ ते ४०७, ४१०, ४२४, ४३३, ४३४, ४३९, ४४२, ४४४, ४४७, ४५३, ४५४, ४५६, ४५७, ४६१, ४६३, ४६५, ४६७, ४६९, ४७०, ४७७, ४७८, ४७९, ४८२, ४८७, ४८८, ४८९, ४९२, ४९५, ४९७, ४९९, ५०१, ५०२, ५०३, ५०५, ५०८, ५११, ५१३, ५१५, ५१७, ५२१, ५२२, ५२४, ५२५, ५२८, ५३०, ५३२, ५३५, ५३६, ५३७, ५४३, ५४४, ५४९, ५५०, ५५२, ५५४, ५५६, ५६०, ५६१, ५६६, ५६७, ५६९, ५७३, ५७४.

**न्याय, शिवतंटे वगैरे :** १२०, १९४, २२५.

**नित्यनियम :** २, १२, २४, २७, २९, ३२, ३८, ४०, ४२, ४४, ४६, ४८, ५८, ५९, ६०, ६९, ७६, ८८ ९१, ९५, ९७, ९८, १०६, ११५, ११६, १२२, १३२, १३७, १३८, १४१, १४४, १४५, १५४, १६७, १७३, १७४, १८१, १८८, १८९, १९०, २०२, २१३, २१५, २३२, २३३, २४४, २४५, २५३, २५८, २७८, २७९, २८०, २८१, २८५, २९४, ३००, ३०२, ३१९, ३२८, ३३३, ३३६, ३४८, ३५०, ३५७, ३६६, ३६७, ३८४, ३८५, ३९६, ३९७, ४०२, ४०८, ४१४, ४१५, ४३२, ४३७, ४३८, ४४५, ४४६, ४४८, ४५२–४५९, ४६६, ४७५, ४७६, ४८१, ४९०, ४९१, ४९३, ४९६, ४९८, ५००, ५०६, ५०७, ५०९, ५१२, ५१४, ५२६, ५२७, ५२९, ५३१, ५३३, ५३८, ५४१, ५५७-५५८, ५५९, ५६२, ५६४, ५६८, ५७०, ५७२.

**राज्यकारभार :** ३, १३, १४, ३७, ४३, ५३, ५६, ५७, ६६, ६७, ७४, ७७, ७९, ८३, ८५, ८६, ९०, ९६, १००, १०२, १०५, १०८, ११२, ११४, १२६, १२८, १२९, १३०, १४२, १५०, १५१, १५२, १५३, १५६, १५७, १६२, १६६, १७१, १७६, १७७, १८०, १९२, २००, २०४, २०६, २०८, २०९, २२१, २२२, २२७, २३०, २३४, २३५, २३६, २३७, २५२, २५४, २५५, २५६, २६०, २६२ ते

**दप्तर क्रमांक ४१, पुडके क्रमांक २—चालू**

**राज्यकारभार : चालू—**

२६४, २६६ ते २७०, २९० ते २९२, ३०३, ३०४, ३०५, ३११, ३१२, ३१४, ३१५, ३१६, ३१७, ३२४, ३२६, ३२९, ३३८, ३३९, ३४४, ३४६, ३४७, ३५१, ३५२, ३६५, ३६८, ३७२ ते ३८१, ३८८, ३८९, ४११ ते ४१३, ४१६, ४१८ ते ४२३, ४२५ ते ४३१, ४३५, ४३६, ४४९, ४५०, ४६२, ४६४, ४६८, ४७१, ४७२, ४७३, ४८०, ४८३, ४८४, ४८६, ४९४, ५१८ ते ५२०, ५३९, ५४२, ५४५, ५४६, ५४८, ५५१, ५६३, ५६५.

**स्वारसिबंदी वगैरे :** १४९, १७०, २२४, ४४०.

**जहागिरदार :** रामचंद्र बल्लाळ गोखले यांस प्रतिनिधीकडून निंबोडे इनाम, १० जाने. १८३० (**१४३**); मुधोजी भोसले व इंग्रजाची जोधपूर येथे भेट, १३ मे १८३० (**३३४**); मुधोजी भोसले याजवर मारेकरी घातल्यामुळे लढाईचा प्रसंग, ७ जून १८३० (**३९०**); दिनकरराव मोहिते यांचे अक्कलकोट येथील रिसाल्यासंबंधीचे पत्र, १३ जुलै १८३० (**४६०**); अक्कलकोटकर शहाजी भोसले व रॉबिनसन यांची भेट, ११ ऑगस्ट १८३० (**५१०**).

**जाहीरनामे :** गाव कामगारांनी चोरट्याची माहिती न दिल्यास त्यांची वतने काढून घेण्याचा जाहीरनामा, २५ मार्च १८३० (२४७); जहागिरदार व कंपनी सरकार यांच्यामधील तहनाम्यांतील फौज, वारसा हक्क, यासंबंधी कलमें, १६ ऑगस्ट १८३० (**५२३**).

**परदेश (बातम्या) :** रोम व रूसवाले यांच्यातील लढाई व तह, १३ नोव्हें. १८२९ (**६५**); ३१ डिसें. १८२९ (**१२४**).

**भारतीय संस्थाने :** बडोदेकर गायकवाड याजपासून पंधरा लक्षाचा मुलूख कंपनी सरकारांत घेण्याच्या कारवाई-बद्दल, १ एप्रिल १८३० (**२६५**).

**राजकीय :** जहागिर, तह वगैरेबद्दलची पेशवे अमलांतील कलमे, ७ नोव्हेंबर १८२९ (**४९–५२**); फौजेबद्दल एका मुसलमानाकडून महाराजांस मिळालेली माहिती, १ जुलै १८३० (**४४०**); सातारकर महाराजाचे स्वामित्व सोडून शहाजी राजे भोसले अक्कलकोटकर यांचा कंपनी सरकारच्या राज्यांत सामील होण्याचा विचार, १ जुलै १८३० (**४४३**).

**राज्यकारभार :** आप्पासाहेब, जनार्दनपंत नातू व रॉबिनसन यांचे राज्याधिकाराबद्दल बोलणे, २२ ऑक्टोबर १८२९ (**३१**); परळीकर स्वामींची तैनात नेमणूक, २५ आक्टोबर १८२९ (**३६**); जमिनी वगैरे इनाम देण्यास कंपनी सरकारची मनाई, १७ नोव्हेंबर १८२९ (**७२**); गायकवाड यांचा वकील व इंग्रजांचा वकील यांच्यांत वमनस्य, १६ डिसेंबर १८२९ (**१०३**); रणजितसिंग व अरब, सिंधी, रोहिले यांच्या लाहोर येथील बंडाबद्दल माहिती, २८ डिसेंबर १८२९ (**११९**); भवानीबाई सचिवांचे, उमाजी नाईक (रामोशी) यांच्या दंग्याबद्दल निवेदन, ३१ डिसेंबर १८२९ (**१२३**); गायकवाड व इंग्रज यांच्यातील लढाईची बातमी, २२ जानेवारी १८३० (**१५८**); साहेब लोकांना कामावरून काढावे म्हणून कंपनी सरकारचा हुकूम, २२ जानेवारी १८३० (**१६०**); गायकवाड व मालकम यांची खाजगी बैठक, २४ जानेवारी १८३० (**१६४**); गोपाळपंत सांगलीकर यांस अडगांव येथे अटक, १२ फेब्रुवारी १८३० (**१९३**); चतरसिंग याचे बंड, २१ फेब्रुवारी १८३० (**२०१**); चोर, गुन्हेगारासंबंधी गांव कामगार, जहागिरदार, इनामदार, वगैरेंचे कर्तव्य, २५ मार्च १८३० (**२४८-२४९**); तलवारींची निर्मिती, २८ मे १८३० (**३५८**); नागपूरकर व कोल्हापूरकर यांचे परस्पर विचारासंबंधी रॉबिन्सन याचे मत, २९ मे १८३० (**३६१**); दांडगाई करणाऱ्या शिपायास अटक करण्याचा हुकूम, २९ मे १८३० (**३६४**).

**सातारा शहर सुधारणा :** शहराचे रस्ते खराब केल्यास शिक्षेचा हुकूम, १२ जून १८३० (**३९१**).

**दप्तर क्रमांक ४१, पुडके क्रमांक २—चालू**

**स्वार, शिबंदी, तोफखाना इतर :** नरगुंदच्या किल्ल्यावर नबाबांची फौज रवाना, १७ नोव्हेंबर १८२९ (७३); इंग्रजांच्या छावणीचा मुक्काम चांगल्या पाण्याच्या जागी हलविणार म्हणून वदंता, २९ नोव्हेंबर १८२९ (८७); फ्रान्सिस, स्वीडीश, स्पेनिश वगैरे प्रकारची तोफांची दारू कशी करावी त्याबाबत माहिती, २७ मे १८३० (३५६); सोलापूरच्या लष्कराविषयी ब्रीकशी पत्रव्यवहार, ११ जुलै १८३० (४५८); दारूगोळा, तोफा वगैरे लष्करी साहित्याची रवानगी, १८ जुलै १८३० (४७४); निळकंठराव शेषाद्री यांनी रॉबिन्सन यास पाठविलेली बारा कलमी यादी (जामदारखाना, कोठी, तोफा, जवाहिरखाना, पागेतील घोडी, गावगना घरे व शेळ्या इत्यादिसंबंधात कलमे), २६ जुलै १८३० (४८५).

---

**पुडके क्रमांक ३**

पत्र क्र. ११११२०, पृष्ठ क्रमांक १ ते ४०१, इ. स. १८३०-१८३१.

(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

(२७ सप्टेंबर १८३० ते १३ ऑक्टोबर १८३१ अखेर)

**खाजगी :** दिल्लीचे बादशहास भेटण्याची महाराजांची उत्सुकता, २३ ऑक्टोबर १८३० (३१).

**छत्रपती व रेसिडेंट :** महाराजांनी जहागिरदारांची व्यवस्था पाहावी अशी रॉबिन्सन याची सूचना, १८ ऑक्टोबर १८३० (२५); अक्कलकोट जहागिरीचे बंदोबस्ताबद्दल रेसिडेंट व महाराज यांचा विचारविनिमय, २१ ऑक्टोबर १८३० (२७); लढाईचे प्रसंगी स्मिथ याने मराठ्यांची बाजू राखल्यामुळे स्मिथ याच्याबद्दल महाराजांची खुशी इंग्रज सरकारला कळविण्याबद्दल रॉबिनसन यास सूचना, ३ डिसेंबर १८३० (८८); पेशवे अमलांतील ब्राह्मणांमध्ये क्षत्रिय वृत्ती नसल्याचे हाटसाहेबाचे मत, ९ जानेवारी १८३१ (१५२); महाराज इंग्रजांस मिळाल्याने हिंदुचे राज्य बुडाले असे ब्राह्मण लोक म्हणतील असे कर्नल याचे मत, १२ जानेवारी १८३१ (१५७); इंग्रजांची दोस्ती राखण्यांत महाराजांची खुषी, १४ एप्रिल १८३१ (३३४); साताऱ्च्या राज्यकारभारासंबंधी, इंग्रज कंपनीकडून छत्रपतींना मिळणारा मुलूख, इंग्रज व छत्रपती यांच्या दोस्ती व लौकीकासंबंधी गव्हर्नर व छत्रपती यांच्यांत चर्चा, ७ सप्टेंबर १८३१ (३५३–३५५); पुण्यांतील लोक लबाड असल्याबद्दल वॉर्डन साहेब याचे मतास महाराजांची अनुमती, ७ सप्टेंबर १८३१ (३५६); इंग्रज सरकारचे उपयोगी पडण्याचा महाराजांचा इरादा, ७ सप्टेंबर १८३१ (३५७); अक्कलकोटच्या बंदोबस्ताविषयी महाराज व रॉबिनसन यांच्यांत विचारविनिमय, ५ ऑक्टोबर १८३१ (३८९);

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :** (खालील पृष्ठांची तारीख २७ सप्टेंबर १८३० ते १३ ऑक्टोबर १८३१ अशी आहे).

**जहागिरदारविषयक :** ३, ४, ५, १०६-१०७, १०९-१२६, २१०-२१२, ३०४-३०७, ३७६-३८४.

**न्यायदान :** ५५, ५६, १९५, २००-२०५, २९४-२९७, ३०९-३१३, ३२७-३३३.

**मामलत :** २५४-२६५.

**राज्यकारभार :** १, ६, ८९, १३, २०, २३, २६, २८-३०, ३२-३६, ३८-४०, ४३-४४, ४६-५१, ५३, ५४, ५७-६० ६२-३३, ६५-७७, ८०-८७, ९१-१०१, १०३, १५८-१६३, १६५-१६८, १७१-१८५, १८७-१९४, १९६-१९९, २०७, २०८, २१५-२१६, २१८, २२४-२२७, २३१-२३८, २४१-२५२, २६८, २७०-२७६, २७९-२९०, ३००, ३०२, ३२०, ३२१, ३२५-३२६, ३३५, ३३७-३५०, ३५२, ३५८ ते ३६४, ३६६-३६९, ३७१-३७५, ३८५-३८८, ३९०-३९१, ३९३-४००.

**जाहागिरदार :** कंपनी सरकारांतून रामराव डफळे व अक्कलकोटकर यांच्या जहागिरीचा बंदोबस्त, १० ऑक्टोबर १८३० (१६–१९); जिमिसन याजकडे भोसले मंडळींनी उत्पन्नासंबंधी केलेल्या अर्जाचे सविस्तर निवेदन, ४ जानेवारी १८३१ (१३९–१४४); जिमिसन याजजवळ असलेले भोसले यांच्या खानदानीच्या माहितीचे पुस्तक, ४ जानेवारी १८३१ (१४५).

**दप्तर क्रमांक ४१, पुडके क्रमांक ३—चालू**

**धार्मिक व सामाजिक :** मराठी मंडळींच्या जातीविषयी चर्चा, ९ ऑक्टोबर १८३० (**१४-१५**) ; जुने राज्य येण्याकरिता धार्मिक कृत्यास प्रारंभ, १७ ऑक्टोबर १८३० (**२२**) ; ब्राह्मण जातीच्या कर्माविषयी, २७ ऑक्टोबर १८३० (**३७**) ; लोकांनी स्वजाती नियमानुसार वागण्याबाबत सूचना, ९ नोव्हेंबर १८३० (**५२**) ; मराठे मुलांना विलायतेत शिक्षण देण्याविषयी, ९ फेब्रुवारी १८३१ (**१८६**) ; धावडसी, वडगांव येथील जयरामस्वामींची गादी चालविण्याबद्दल, १४ मार्च १८३१ (**२०९**) ; मुली व बायकांस शाळेत न घालता घरीच शिक्षण देण्याविषयी, २५ मार्च १८३१ (**२२०**).

**बातमी :** जहाज बुडून गव्हर्नर मालकम वारल्याची, २४ मार्च १८३१ (**२१९**) ; उमाजी नाईक याचे प्रचिलगडावर वास्तव्य, २६ एप्रिल १८३१ (**२४०**) ; रॉबिन्सन याच्या मुलींस देवाज्ञा, १४ मे १८३१ (**२६७**).

**भारतीय संस्थाने :** अक्कलकोटच्या बंडाचे बंदोबस्ताकरिता बजाबा यास साताऱ्यास जाण्याचा हुकूम, १६ नोव्हेंबर १८३० (**६४**) ; अक्कलकोट येथील बंदोबस्तास सोलापूरहून संत्री लोकांचे आगमन, १४ डिसेंबर १८३० (**१०५**).

**राजकीय :** कंपनी सरकारचे सैन्य व उमाजी नाईक, भोज्या रामोशी यांची वाईचे डोंगरांतील झटापट, १८ ऑक्टोबर १८३० (**२४**) ; फरासिसांशी बिघाड, २६ नोव्हेंबर १८३० (**७८**) ; जिमिसन याजकडून रेसिडेंट यास आलल्या पत्रावरून देशमुखांच्या फितुरीचा संशय, २७ नोव्हेंबर १८३० (**७९**) ; शिपाई लोकांना नोकरीतून काढल्यास फितुरीचा संभव, ५ डिसेंबर १८३० (**९०**) ; अक्कलकोट येथे फितूर होऊ नये म्हणून हरिपंत विसाजी, जयराम वगैरेंना पुण्यास स्थानबद्ध करण्याचा गव्हर्नर मालकम याचा हुकूम, २८ डिसेंबर १८३० (**१३०**) ; तुळजाबाई फितुरी करण्याचा संभव म्हणून त्यांना माहेरी पाठवण्याचा रेसिडेंटचा हुकूम, ५ जानेवारी १८३१ (**१४६**) ; बंडखोरांशी झालेल्या चकमकीत महाराजांनी मदत न केल्याबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांचे मुंबईस पत्र रवाना, इंग्रज व मराठे यांच्या दोस्तीविषयी रॉबिन्सन याजकडील माणसांचे निवेदन, २० मार्च १८३१ (**२१३-२१४**) ; बापू कानो फडणीस व रघुनाथ गुजर यांना फितुरी न करण्याबद्दल ताकीद, १७ जून १८३१ (**२९३**) ; उमाजी रामोशी यास महाराजांचा आश्रय मिळत असल्याचा इंग्रजांना संशय व त्याच्या बंडाचा मोड करण्याची योजना, २० जून १८३१ (**२९८**), २२ जून १८३१ (**३०१**) ; २३ जून १८३१ (**३०३**) ; इंग्रजांचा रोमवाल्यांशी दोस्ती करण्याचा प्रयत्न, २७ जून १८३१ (**३०८**) ; पोलंड व रुस (रशिया) यांच्या लढाई संबंधांत विलायतेत इंग्रज सरकारी वकीलांमध्ये दुमत, ६ जुलै १८३१ (**३१४**) ; रशियन व इंग्रज यांच्यांत बिघाड झाल्यास इराणवाले रशियन लोकांस सामील होण्याचा व त्यामुळे हिंदुस्थानांत इंग्रजांस उपद्रव होण्याचा संभव, इराणमधील ब्रिटीश वकीलात करण्यास एल्फिन्स्टन व मालकम हयांचा नकार, ६ जुलै १८३१ (**३१५**) ; सैद आमद याचे बंड मोडण्यास खडगसिंग याचे मुजफराबाद येथे फौजेसह गमन, ६ जुलै १८३१ (**३१६**) ; सतलज नदीपलीकडे रणजितसिंग शीख व इंग्रज यांच्या लढाईचा संभव, मारवाड देशांत पेंढाऱ्यांच्या बंदोबस्तासाठी इंग्रजी फौज रवाना, ७ जुलै १८३१ (**३१७**) ; म्हैसूरच्या कुमार राज्यांशी इंग्रजांची लढाई होऊन इंग्रज फलटणांचे पलायन, कछभुजकडे बंडाचा मोड करीत असता गुलाबखां पडला म्हणून दाजिबा घोरपडे यास नवे स्वार ठेवण्याबद्दल सूचना, ७ जुलै १८३१ (**३१९**) ; मुंबई सरकारच्या हुकूमावरून रिडीलसाहेब यास कैद, १० ऑगस्ट १८३१ (**३३६**) ; रणजितसिंग याची भेट घेण्यासाठीं लाटसाहेब याचे सतलज नदीकड गमन ४ सप्टेंबर १८३१ (**३५१**).

**राज्यकारभार :** बाला मोहिते जामदार व संताजी गायकवाड यांच्या एकनिष्ठतेवर खूष होऊन त्यांना बढती, २८ सप्टेंबर १८३० (**२**) ; अक्कलकोटच्या बंदोबस्तासाठी जाण्याचा रेसिडेंट याचा विचार, ४ ऑक्टोबर १८३० (**७**) ; देवस्थानच्या जमाखर्चाचे हिशेब, ६ ऑक्टोबर १८३० (**१०**) ; अक्कलकोट ठाण्याचा कबजा रेसिडेंटच्या सल्ल्याने घेण्याचा विचार, ७ ऑक्टोबर १८३० (**११**) ;

**राज्यकारभार : चालू--**

यवतेश्वर येथील गुरवाच्या वहिवाटीसंबंधी विचारणा, ८ ऑक्टोबर १८३० (१२); दिवाळीचे सणासाठी रॉबिन्सन याचे बाळाजीपंत याचेमार्फत खर्चाची व्यवस्था, १६ ऑक्टोबर १८३० (२१); नहरास बंगला बांधला असल्यामुळे तिकडील सरहद्द निश्चित ठरवून देण्याविषयी रॉबिन्सन याची मागणी, २७ ऑक्टोबर १८३० (३७); शिबंदीचे स्वार देण्याबद्दल बाबाजी यांची मागणी, भोसले यांच्याकडील शिबंदीची बडतर्फी, १३ डिसेंबर १८३० (१०२); स्वारी खर्चाबद्दल गव्हर्नरचा रेसिडेंट यास हुकूम व भोसले यांच्याकडील नाणी, पुतळ्या वगैरे विकण्याची सूचना, १४ डिसेंबर १८३० (१०४); कृष्णाजी बल्लाळ मोडक यास इनाम, १४ डिसेंबर १८३० (१०८); सरदेशमुख यास धरून देण्याबद्दल कंपनी सरकारची हैद्राबाद येथे पत्रे रवाना, २७ डिसेंबर १८३० (१२७); सातारा येथे वस्ती करण्यासाठी सरकारांतून दिलेल्या जागासंबंधी नियम, २० जानेवारी १८३१ (१६४); वैराटगडाजवळ व पांडवगडचे डोंगरांत इंग्रज लोक व बेरड यांच्या चकमकी, २४ जानेवारी १८३१ (१६९-१७०); उमाजी रामोशी याचे बंड मोडण्यासाठी कंपनीकडून फौज रवाना, ८ मार्च १८३१ (२०६); उमाजी यास धरून देणारांस बक्षीसाचे अमीष, २२ मार्च १८३१ (२१७); खाजगी खर्चाचा हिशेब देण्यास विलायतेच्या बादशहाचा नकार, वेलस्लीचा राजीनामा, २६ मार्च १८३१ (२२१-२२२) उमाजी व पिरा रामोशी याचा शोध करण्याबद्दल रॉबिन्सन याचा हुकूम, २७ मार्च १८३१ (२२३); ८ मे १८३१ (२५३); १४ मे १८३१ (२६६); इंग्रजी नाणे वापरण्याबद्दलचा कायदा, ७ एप्रिल १८३१ (२२८-२३०); कंपनी सरकारचे तपासनीस व वाई पेठचातील पाटील कुलकर्णी यांच्यांत भांडण, २५ एप्रिल १८३१ (२३९); रघुनाथ जयवंत यांस मंत्रीपदाची वस्त्रे व मेजवानी, १४ मे १८३१ (२६९), १९ मे १८३१ (२७७); २१ म १८३१ (२७८); चोरांच्या पारिपत्या-संबंधी चर्चा, १६ जून १८३१ (२९१-२९२); रॉबिन्सन याच्यानंतर लाडविक याची रेसिडेंट म्हणून नमणूक, १९ जुल १८३१ (३२२); गव्हर्नराचे भेटीचे कायद्याची माहिती, २१ जुलै १८३१ (३२३); २२ जुलै १८३१ (३२४); पेन्शन द्यावयाच्या लोकांची वागणूक कळविण्या-बद्दल कलेक्टरास हुकूम, ६ ऑगस्ट १८३१ (३३४); नाना पुरंदरे यांच्या पुत्रास दिवाणगिरी देण्यास नकार, ११ सप्टेंबर १८३१ (३६५); नाणी चालविण्याबद्दल सावकारांची महाराजांस विचारणा, १८ सप्टबर १८३१ (३७०); मिलीटरी लोकांच्या पगारांत कपात करण्यास इंग्रज सरकारचा नकार, ७ ऑक्टोबर १८३१ (३९२); टंकशाळा बंद करण्याबद्दल, १३ ऑक्टोबर १८३१ (४०१).

---

## पुडके क्रमांक ४

पत्र क्र. १९१२१ पृष्ठ क्रमांक १ ते ३६९ इ. स. १८३१-१८३२.

### (प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)
### (१४ ऑक्टोबर १८३१ ते २ ऑक्टोबर १८३२ अखेर)

**किरकोळ :** सीमोल्लंघन समारंभ, १५ ऑक्टोबर १८३१ (१) :

**जहागिरीसंबंधी :** **(अक्कलकोटकरासंबंधी)** अक्कलकोट जहागिरीसंबंधांत रॉबिन्सन याची महाराजांशी चर्चा, १८ ऑक्टोबर १८३१ (५); अक्कलकोटकरांबाबत जिमिसन याच्याशी गव्हर्नराचा जाबसाल, २१ ऑक्टोबर १८३१ (११-१२); अक्कलकोट प्रकरणीचे धोरणासंबंधी कलमे, १० नोव्हेंबर १८३१ (३५); अक्कलकोट येथील जमाबंदीसाठी सोलापुरी जाण्याचा महाराजांचा विचार, १० नोव्हेंबर १८३१ (४०); महाराजांनी अक्कलकोटचा कारभार केल्यामुळे लावणीची नुकसानी झाल्याची जिमिसन याची तक्रार, २४ जून १८३२ (२६८); अक्कलकोट येथील जमीन महसुलास जमीनदाराचा अडथळा, ४ जुलै १८३२ (२७९); अक्कलकोट प्रकरणी रेसिडेंट लाडविक व महाराज याची चर्चा, ११ ऑगस्ट १८३२ (३२३).

**दप्तर क्रमांक ४१,** पुडके क्रमांक ४—चालू

**इतर जहागिऱ्यांसंबंधी :** कंपनी सरकारची चाकरी करण्यास रामराव डफळे जतकर यांचा नकार, सचिव प्रकरणाचा महाराजांकडून निकाल करून घेण्याबद्दल कंपनी सरकारचे पत्र, १९ ऑक्टोबर १८३१ (६-७) ; पंत अमात्य याजकडील सरंजाम वगैरेची जप्ती, १४ नोव्हेंबर १८३१(४६) ; बंडखोर उमाजी रामोशी, सोलसीकर व कोथळेकर यांना कैद केल्याचे सचिवांच्या मातुश्रीचे पत्र, २६-२७ डिसेंबर १८३१(१००–१०३) ; व्यंकटराव मचाले याच्या जहागिर गांवांचा अमीर नवाजखान याजकडून कब्जा, १४ एप्रिल १८३२ (१९६-१९७) ; सचिवांचे दत्तक प्रकरणापासून दत्तकप्रकरणी नजर घेण्याचा कायदा, १० मे १८३२(२२५) ; फलटण जहागिरीवरील कर्जाबद्दल महाराज व नातू यांचा पत्रव्यवहार, ८ जून १८३२(२५५) ; तासगांवकर यांच्याकडून मुलखास होणाऱ्या उपद्रवाचा कंपनी सरकारकडून करावयाचा बंदोबस्त, २५ जून १८३२(२७१) ; बाबाजी आंग्रे याची कैद व कंपनी सरकारांतून त्याच्या मुलखाचा बंदोबस्त, २ ऑगस्ट १८३२(३०६) ; लक्ष्मीबाई प्रतिनिधी, अक्कलकोटकर व शिर्के यांच्यासंबंधी रेसिडेंट लाडविक व महाराज यांची चर्चा, ११ ऑगस्ट १८३२(३२२-३२३).

**धार्मिक व सामाजिक :** ग्रामण्याबद्दल ब्राह्मणांनी केलेल्या फिर्यादीस गव्हर्नराचा जबाब, १८ ऑक्टोबर १८३१ (५) ; रॉबिन्सन याचा जाहीरनामा, २१ ऑक्टोबर १८३१(११) ; अग्निहोत्री ब्राह्मणांना हत्तीवर बसण्याच्या अधिकाराबद्दल शास्त्रार्थ, २६ ऑक्टोबर १८३१(१९) ; प्रभूंचा महाराजांनी पक्ष धरल्याबद्दल पुणेकर व वाईकर ब्राह्मणांनी गव्हर्नराकडे केलल्या अर्जावर साक्ष दिल्याबद्दल नीलकंठ शास्त्री यास समज व बडतर्फी, ३१ ऑक्टोबर १८३१(२५) ; १५ डिसेंबर १८३१(७९-८०) ; ठाकूरदास शास्त्री यांजकडून कर्नाटकचे राजे व त्यांचे सोयरे यांच्या जातीतील चालिरीतिसंबंधी ग्रंथ लेखन व त्यासाठी म्हैसूर, तंजावर येथे त्यांची रवानगी, १३ डिसेंबर १८३१ (७७) ; १४ मार्च १८३२(१७२) ; ३० जुलै १८३१(३०४) ; महाराजांनी प्रभू जातीचा पक्ष न धरता धर्माच्या बाबतीत सर्वांना न्यायाची वागणूक देण्याबद्दल कंपनी सरकारचा जाहीरनामा, १५ डिसेंबर १८३१(७८) ; पुणकर ब्राह्मणांविरूद्ध बळवंतराव चिटणीस याचा कंपनी सरकारांत अर्ज, १८ डिसेंबर १८३१ (८१) ; उदेपुराहून तेथील रितीरिवाज धार्मिक कृत्ये क्षत्रिय जात वगैरे-संबंधी माहिती आणल्याबद्दल आप्पासाहेब यांचेजवळ शिवानंद शास्त्री याचे निवेदन व उदेपूर येथे पत्र रवाना, २२ फब्रुवारी १८३२ (१५७) ; १४ मार्च १८३२(१७१) ; शिवानंद शास्त्री यांनी ज्ञातीप्रकरणी उदेपूरहून आणलेल्या ग्रंथाबाबत चर्चा, १९ मार्च १८३२(१७६–१७८) ; ज्ञाती प्रकरणी करावयाच्या वर्तणुकीबद्दल गुजर, सरलष्कर, शिर्के वगैरेची चर्चा, २५ मार्च १८३२ (१८१-१८२) ; गुज्याबा गुजर व रामचंद्र मोहिते यांच्यातील सोयरिकीबद्दल कलमे, १२ मे १८३२(२२७-२२८) ; मशिदीतील सरकारी ताबुताच्या बंदोबस्ताची व्यवस्था, ६ जून १८३२ (२५३) ; शास्त्र वचनानुसार मुंबई येथे पारशी यांची पाद्री व त्यांच्या जनरलशी झालल्या मारामारीबद्दल लाडविक याचे निवेदन, १९ जून १८३२(२६३) ; दत्तकाच्या चालीबद्दल परशराम पंडित प्रतिनिधीचे निवेदन, ९ जुलै १८३२(२८५).

**बातम्या :** लाट व रणजितसिंग यांची भेट, २६-२७ ऑक्टोबर १८३१ (२१-२२) ; ७ नोव्हेंबर १८३१ (३२) ; म्हैसूरकर कुमार राजांच्या दौलतींच्या बंदोबस्तासाठी ब्रिक याची नेमणूक, १० नोव्हेंबर १८३१(३९) ; रॉबिन्सन रेसिडेंट याच्या जागेवर लाडविक याची नेमणूक, ११ डिसेंबर १८३१ (७३) ; ३१ डिसेंबर १८३१(१०५) ; वारीस विलायतेस गेल्यावर लाडविक याचा सातारा येथे येण्याचा बेत, पॉटिंजर याची सिंध प्रांतांत नेमणूक, लाड याच्या भेटीसाठी गव्हर्नराचे गुजराथ व अजमेर येथे गमन, १२ डिसेंबर १८३१(७४) ; स्पेन, पोर्तुगाल, रुस वगैरेच्या लढाईसंबंधी कर्नल याचे विलायतेत उत्तर, रुसांशी रणजितसिंग याने केलेल्या दोस्तीपासून रणजितसिंग यास परावृत्त करण्याचा लाट याचा प्रयत्न, १८ डिसेंबर १८३१(८७) ; हैद्राबादकरांनी लढाई केल्याखेरीज त्यांच्या कामांत लक्ष न घालण्याबाबत विलायत सरकारचा हुकूम , २० डिसेंबर १८३१(९०) ; रणजितसिंग तीन लाख फौजेसह येणार असल्याची बातमी, १ जानेवारी १८३२ (१०६) ; मालकम याचे विलायतेतील राजकीय काम, ब्रीक याची म्हैसूरच्या कमिशनवर

**बातम्या :** चालू—

नेमणूक, २ जानेवारी १८३२(१०७) ; नेस्विट याची पैसे खाल्ल्याबद्दल बडतर्फी व त्याचे जागेवर अंडरसन याची नेमणूक, २ जानेवारी १८३२(१०८) ; १३ फेब्रुवारी १८३२ (१५०) ; विलायतेस झालेल्या टोपीकरांच्या तहाबद्दल साहेब लोकांत नापसंती, ५ जानेवारी १८३२(१०९); लाट व दिल्लीच्या बादशहाची भेट, दिल्ली येथील वकिलीवर साहेबाची नेमणूक, ४ फेब्रुवारी १८३२(१४५) ; विलायतेस रयतेकडून वजीर, कामदार वगैरेंच्या घरांची जाळपोळ, बादशहाचे भावास व वेलस्ली यांना मारहाण, २२ फेब्रुवारी १८३२(१५७) ; उदेपूरकर व जोधपूरकर यांची लढाईची तयारी पाहून इंग्रजांची तहास तयारी, मुधोजी भोसले यास गादीवर बसविण्याबद्दल उदेपूरकर व जोधपूरकर यांच्याशी इंग्रजांची मसलत, ७ मार्च १८३२ (१६२–१६४); मुधोजी भोसले यांस स्वाधीन करण्याच्या इंग्रजांच्या तगाद्यामुळे उदेपूरकर व जोधपूरकर यांची लढाईची तयारी, २५ मार्च १८३२(१८२-१८३) ; राज्यकारभारांत इंग्रजांचा हस्तक्षेप टाळण्यासाठी म्हैसूरकर यांच्यातर्फे ब्रीक याची विलायतेस रवानगी, २७ एप्रिल १८३२(२१५) ; जर्मन साहेब बारन हुगल व लिंजट यांचे देश पहाण्यासाठी आगमन, २० मे १८३२(२३८) ; हिंदुस्थानांत बनविलेल्या बंदुकीची व पिस्तुलाची बारनहुगल याच्याकडून मागणी, २२ मे १८३२(२३९) ; ब्रीक व म्हैसूरकर राजे यांच्यातील वैमनस्यामुळे म्हैसूरच्या रेसिडेंन्सीवर दुसऱ्याची नेमणूक करण्याची ब्रीक याची लाट यास विनंती, २५ मे १८३२(२४२); गव्हर्नर क्लेर यांचे पुण्यास आगमन, ८ जून १८३२(२५५) ; एल्फिन्स्टन याचे फरेंचांच्या मुलखांत प्रयाण, आदम याच्या मृत्युबद्दल ग्रँट याचे लाडविक यास पत्र, ३ जुलै १८३२(२८०) ; मलाक्का द्विपांतील लोकांशी इंग्रजांची लढाइ, मच्छीबंदर प्रांती बंड, हिंदुस्थान व चीनमध्ये इंग्रज कंपनीच्या लोकांना द्यावयाच्या सवलतीबाबत इंग्लंडच्या बादशहाने केलेला करार, २३ जुलै १८३२(२९४-२९५) ; बादशहास द्यावयाच्या खंडणीत सवलत मिळण्याबद्दल इराणच्या सावकाराची तेथील इंग्रज अधिकाऱ्यास विनंती, काश्मिर सुभ्यांत जबरदस्ती अंमल केल्यामुळे खड्गसिंग याचे जागी रणजितसिंग याजकडून दुसऱ्या सुभ्याची नेमणूक, इंग्रजांशी असलेल्या दोस्तीच्या बळावर मिस्तरवाल्या महंमदअली बादशहा याचा रुमवाल्यांशी बिघाड, ३० जुलै १८३२(३००) ; मद्रासच्या गव्हर्नरच्या जागी हैसूरच्या रेसिडेंटची नेमणूक, हिंदुस्थानांतील राज्यकारभारासंबंधी विचारविनिमय, पारकर प्रांतातील बंडवाल्यांच्या पारिपत्याचा विचार, ७ ऑगस्ट १८३२(३१२) ; विलायतेस बादशहाचा वजिरांशी वादविवाद, वजिरांचे नोकरीचे राजीनामे, २३ ऑगस्ट १८३२ (३३१) ; रुस व फरासिस यांचा हिंदवर स्वारी करण्याचा बेत, संस्थानच्या कारभारांतील गैरव्यवस्थेमुळे म्हैसूरकर कुमार राजाकडे ब्रिक याची कमिशनर म्हणून नेमणूक, २१ सप्टेंबर १८३२(३५७); इराणवाल्यांशी झालेल्या लढाईत शिखांचा पाडाव व इंग्रजांचा शिखांना मदत करण्याचा विचार, २६ सप्टेंबर १८३२(३६०).

**महाराज व इंग्रज संबंध :** गव्हर्नराच्या महाराजावरील मर्जीबद्दल रॉबिन्सन याचे बाळाजी नातू याच्याशी बोलणे, लाडविक याचा महाराजांच्या भेटीस येण्याचा विचार, २३ ऑक्टोबर १८३१ (१५-१६); इंग्रजी मुलखांचा वसूल कमी होत असल्याबद्दल रॉबिन्सन याची विचारणा, १४ नोव्हेंबर १८३१ (४४) ; शेतीस व राहण्यास रयताव्याने जमीन व जागा देण्याबद्दल कर्णेल याची महाराजाजवळ विनंती, १९ डिसेंबर १८३१(८८) ; रॉबिन्सन साताऱ्याच्या रेसिडेंटीवरून विलायतला जाणार असून त्या जागी मुंबईहून लाडविक याची नेमणूक, २९ डिसेंबर १८३१(१०५) ; रॉबिन्सन याचे विलायतेस गमन, ८ जानेवारी १८३२(१११) ; महाराजांना विलायतेस येण्याच्या केलेल्या आमंत्रणाबद्दल रॉबिन्सन कलेक्टर व महाराज यांची चर्चा, १० जानेवारी १८३२(११४) ; उमाजी रामोशी यास धरून दिल्याबद्दल जान्या, काल्या, व आन्या रामोशी यांना जिब्रीन साहब यांच्याकडून गुन्ह्याची माफी, १४ जानेवारी १८३२ (११६) ; कोल्हापूरकर व अंडरसन यांची भेट, हिंदु व इंग्रज दोस्तीबद्दल महाराज व रेसिडेंट चर्चा, १४ मार्च १८३२(१७३) ; मुलखाच्या वसुलीसाठी इंग्रज अधिकारी नेमण्याबद्दल महाराजांना रेसिडेंटचा सल्ला, २७ एप्रिल १८३२ (२०९) ; महाराजांशी दोस्ती ठेवण्याचा लाडविक व कल्यार यांचा मनोदय, ३ जुलै १८३२ (२८१); राज्यकारभार महाराजांचे स्वाधीन करण्याचा कंपनी सरकारचा विचार, २३ ऑगस्ट १८३२(३३१) ; गव्हर्नर कल्यार याचे भेटीचा समारंभ, ३ ऑक्टोबर १८३२(३६८–३६९).

**राज्यकारभारासंबंधी : चालू—**

रणजितसिंग व लाट साहेब यांची सतलज नदी अलीकडे भेट, १३ फेब्रुवारी १८३२ (१४९); उमाजी रामोशी व सोलसीकर यांना फांशीची शिक्षा, ३ एप्रिल १८३२ (१८७); शिक्षणाबद्दल हुकूम, १४ व १६ एप्रिल १८३२ (१९७–२००); चोरांच्या बंदोबस्ताबद्दल मनरोल याने केलेल्या कायद्याबद्दल जवाब, २७ एप्रिल १८३२ (२१६-२१८); वतनाच्या खरेदीविक्रीसंबंधी जाहीरनामा, १२ मे १८३२ (२३०); गव्हर्नर क्लेर याचे पुण्यास आगमन, ८ जून १८३२ (२५५); फरासखान्याचे सरंजामाबद्दल व भाड्याविषयी जाहीरनामा, २१ जून १८३२ (२६६); गावखर्चातून शिबंदीखर्च करण्याचा इंग्रज कलेक्टरचा हुकूम, २४ जून १८३२ (२६८); सातारा येथे तयार होणाऱ्या व बाहेरून येणाऱ्या जिनसांबाबत जाहीरनामा, २४ जून १८३२ (२७०).

---

## दप्तर क्रमांक ४२

### पुडके क्रमांक १ ते ५

### पुडके क्रमांक १

पत्र क्र. १९१२२. पृष्ठे सं. १ ते ३६१, इ. स. १८३२-३३.

(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी ४ ऑक्टोबर १८३२ ते २१ ऑक्टोबर १८३३).

**आर्थिक :**

मंदीमुळे वसुलीवर परिणाम, १२ ऑक्टोबर १८३२ (१३) ; अमेरिकेतून इंग्लंडमध्ये येणाऱ्या सोने, रुपे वगैरेची आवक बंद, हिंदुस्थानांतील मामलती खर्चात कपात करण्याच्या शक्याशक्यतेबाबत कंपनी सरकारची सूचना, १९ जुलै १८३३ (२७४–२७७).

**किरकोळ :**—जर्मन रहिवाशांची विजापूर येथे भेट, ९ नोव्हेंबर १८३२ (३८) ; देवी काढण्याकरिता डॉक्टरांची नेमणूक, १० नोव्हेंबर १८३२ (३९) ; प्रतिनिधीच्या खाजगी भांडणांत साहेबाची मध्यस्थी, २७ नोव्हेंबर १८३२ (६१) ; राममोहन रॉय यांचे मुंबईत आगमन होणार असल्याची बातमी, ८ जानेवारी १८३३ (११०) ; हैद्राबादच्या दिवाणाचा मृत्यु व मृत्युपत्राची व्यवस्था, २८ जाने. १८३३ (१२६) ; बाळाजीपंत नातू यानी लांच घेतली या आरोपाचे खंडन, १ एप्रिल १८३३ (१८१) ; टांकसाळी बंद करण्याच्या इंग्रजांच्या हुकुमाची अंमलबजावणी, २४ एप्रिल १८३३ (२०१) ; इंग्रजांकडील, करवीर येथील रामराव याची महाराजांशी भेट घेण्याची इच्छा, १४ जुलै १८३३ (२६६) ; बायजाबाई शिंदे हिचा दत्तकपुत्र जनकोजी याचेशी तंटा व लढाई, ३१ जुलै १८३३ (२९०) ; दुर्गाबाईचा (रामचंद्र भाऊ यांची पत्नी) मृत्यु झाल्याची वार्ता, ७ ऑगस्ट १८३३ (२९५) ; अमरसिंग शिर्के याजवर कांही दोषारोप, २३ सप्टेंबर १८३३ (३३३) ; सृष्टी चमत्कार घडल्याचे उदाहरण, ८ ऑक्टोबर १८३३ (३४६) ; गव्हर्नर (लॉर्ड क्लेअर) विलायतेस जाणार असल्याचा बोलवा (३५७) ; निरनिराळ्या ओतीव तोफांचे नमुने, २० ऑक्टोबर १८३३ (३६०).

**खाजगी :**

वॉर्डन याच्या मेजवानीप्रसंगी माणकाचा जडाव असलेल्या सोन्याच्या गोफाची भेट, ८ ऑक्टोबर १८३२ (४) ; महाराजांच्या स्तुतीवर गव्हर्नरांचे इंग्रजीतील भाषण, १२ ऑक्टोबर १८३२ (९) ; गव्हर्नरांना महाराजांविषयी वाटणारा आदर, १२ ऑक्टोबर १८३२ (१३) ; महाराज व एल्फिन्स्टन यांच्यातील घनिष्ठ संबंध, २७ ऑक्टोबर १८३२ (२७) ; शहाजी भोसले यांस फक्त विद्याभ्यासच शिकविण्याबाबत बाळशास्त्री यास हुकूम, १३ डिसेंबर १८३२ (८४) ; बाळशास्त्री यानी कसे वागावे यासंबंधी छत्रपती महाराजांच्या सूचना, ३ जानेवारी १८३३ (९८) ; आवर्षणामुळे भोसले घराण्याची घरखर्चात कपात, ५ जानेवारी १८३३ (१०६) ; उदेपूर घराण्याशी शरीरसंबंध जोडण्याची महाराजांची अतीव इच्छा, १ फेब्रुवारी १८३३ (१३२-१३३) ; शाहू महाराज मेहनती व चाणाक्ष नजरेचे होते याबद्दलचा पुरावा, ११ मार्च १८३३ (१७१) ; इंग्रजांच्या गैरवागणुकीबाबत प्रतापसिंह महाराजांची विलायतेत तक्रार, २३ जून १८३३ (२४७) ; चिमणाजी शिर्के यास प्रायश्चित देऊन ज्ञातीत घेण्याचा विचार, ३० जून १८३३ (२५७) ; शिवानंद शास्त्री यांचा सत्कार, ६ सप्टेंबर १८३३ (३२०).

**छत्रपती व रेसिडेन्ट :**

खर्चात करावयाच्या कपातीबाबत रेसिडेंट लाडवीक याजबरोबर चर्चा, १८ ऑगस्ट १८३३ (३०५), मुतालिकाने करावयाच्या कारभाराविषयी काहीं सूचना, २६ ऑगस्ट १८३३ (३०९).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :**

(खालील पृष्ठांची ४ ऑक्टोबर १८३२ ते २१ ऑक्टोबर १८३३ ही तारीख आहे.)

**खाजगी :**

१, ३, ५, १५-१६, १९-२२, २९, ३२, ३५, ३७, ४२, ४७-५२, ५६, ६५-६७, ७४, ७८-८२, ८६, ८८-९०, ९४-९७, १११-११६, ११९-१२२, १२४, १४२-१४४, १५६-१५८, १६०-१६७, १६९-१७०, १७२-१७८, १८२-१८४, १८६-१९०, १९२-१९३, २०३-२०५, २०७-२०८,

खाजगी : चालू—

२१०-२१२, २१४-२२०, २२५-२३२, २३४-२३८, २४०-२४५, २५१-२५६, २५८-२६२, २६५, २६७-२७१, २८४-२८८, २९१, २९८, २९९, ३०६-३०८, ३१२-३१६, ३१८-३१९, ३२१-३२२, ३२४-३२५, ३२७-३३१, ३३४-३४५, ३४८-३४९, ३५१-३५५.

धार्मिक :

६८, ११३, १२५, ३५९.

राजकारण :

२५, २६, १४१, १४८, १४९, १५१-१५५, १९९, २००, ३०१-३०४.

राज्यकारभार :

२३, ४५-४६, ५३, ५८-६०, ६२-६३, ७०, ८३, ९२, ९९, १०१-१०५, १३५-१३७, १८०, १९५-१९७, २०६, २४८, २६३-२६४, २७३, २७९-२८३, २९७, ३१०-३११, ३६१.

सामाजिक :

७-८, ११-१२, २५, ४४, १६८, २२२, २७८, २९३-२९४, २९६, ३१७, ३२३, ३५६.

हिशेब :

३३, ४०, ५४, ५५, १०८-१०९, १२७-१३१, १३४, २१३, ३५०.

जहागिरविषयक :

जहागिरदार वगैरे लोकांच्या वहिवाटी कशा ठरवाव्या व ठेवाव्या यासंबंधीचे इंग्रजांचे मार्गदर्शन, १२ फेब्रुवारी १८३३ (१५०).

धार्मिक :

धर्मशास्त्रार्थाच्या निर्णयरूपी ग्रंथाचे तपशीलवार निवेदन, १२ नोव्हेंबर १८३२ (४३) ; कर्नाटकी भाषेतील वेदोक्त धर्मग्रंथाबाबत व विजापूर येथील गोलघुमट व जुम्मा मशीद यांची डागडुजी, २८ नोव्हेंबर १८३२ (६४) ; ज्ञातीसंबंधांतील व्यवहार शास्त्रार्थ (६८) ; ज्ञातीप्रकरणसंबंधांत वेदांचे खोटे आधार दऊन निवाडा करण्याचा ब्राह्मणांचा अश्लाघ्य प्रयत्न, ६ डिसेंबर १८३२ (७५) ; सणांच्या खर्चावर इंग्रजांकडून बंदी, २८ डिसेंबर १८३२ (९३) ; कर्नाटकांत क्षत्रिय ज्ञातीचे राजे वेदोक्त कर्म करीत असल्याची माहिती, ३१ मार्च १८३३ (१७९) ; ज्ञातीकर्माबाबतचे वेदोक्त ग्रंथांच्या आधारे विवेचन, २ मे १८३३ (२०९) ; कोल्हापूरकर, नागपूरकर वगैरेमधील ज्ञातीव्यवहारविषयीचा पत्रव्यवहार, १ जून १८३३ (२३३) ; सुतक पाळण्याबाबत ज्ञातीतील अधिकाराची कक्षा यावर निर्णय, २४ जून १८३३ (२४९) ; चिमणाजी शिर्के यास प्राय:श्चित देऊन ज्ञातीत घेण्याचा विचार, ३० जून १८३३ (२५७) ; कोल्हापूरकर भोसले यांनी पाळलेल्या कांहीं धार्मिक रीतिरिवाजांचा उल्लेख, ३० जुलै १८३३ (२८९) ; ज्ञातीव्यवहारविषयीचा तंटा, ३ ऑगस्ट १८३३ (२९२); शिर्के व गायकवाड यांचेमधील लग्नसंबंधाबाबतचा वाद, २३ सप्टेंबर १८३३ (३३२); ज्ञाती प्रकरणाविषयी गुंजाबा गुजर यांचे पत्र, ८ ऑक्टोबर १८३३ (३४७); चातुर्वर्ण्याची कामे व चालू परिस्थितीतील आचारहीनता, १९ ऑक्टोबर १८३३ (३५८).

न्याय :

लहान गुन्हेगारीची चौकशी पेटचास व मोठ्या गुन्हेगारीची चौकशी हुजूरकडे होण्याची पद्धत, ५ ऑक्टोबर १८३२ (२) ; ज्ञातीप्रकरणाविषयी न्याय करण्याकरितां शिवानंद यांची उदेपूर येथे रवानगी, २३ जानेवारी १८३३ (१२३) ; पोलिसांवर दगडफेक करणारास गोळी घालून ठार मारण्याची शिक्षा, २२ एप्रिल १८३३ (१९८).

राजकीय :

अमिराच्या दर्ज्याबाबत मालकम, वेलस्ली व एल्फिस्टन यांच्यामधील दुफळी (१०) ; जोधपूरवाले व इंग्रज यांचा बिघाड झाल्याची अफवा, १२ ऑक्टोबर १८३२ (१४); मुंबईच्या आसपास गोऱ्या लोकांच्या संशयित जहाजांचा वापर, १८ ऑक्टोबर १८३२ (१८) ; छत्रपति, पेशवे, शिंदे, होळकर वगैरेंच्या आपसांतील संबंधाबाबत महाराजांचे मत, २६ ऑक्टोबर १८३२ (२४); अरब बादशहाच्या युद्धविषयक हालचाली, ३ नोव्हेंबर १८३२ (३४) ; रूस व फरासीस यांजकडील बातमीपत्र, ७ नोव्हेंबर १८३२ (३६) ; १८१८ चे लढाईपूर्वीची मोर दीक्षित व एल्फिस्टन यांची विश्रामबागवाड्यांतील भेट, १० नोव्हेंबर १८३२ (४१) ; हिंदुस्थानातील राजेरजवाड्यांचा

**राजकीय : चालू—**

रूसवाल्यांच्या मदतीने बंड करण्याचा प्रयत्न, २ डिसेंबर १८३२ (७२) ; हिंदुस्थानांत येणाऱ्या रूसवाल्याशी बोलणी करण्याकरितां एल्फिस्टन येणार असल्याची वदंता, ५ डिसेंबर १८३२ (७३), बंगलोर येथील बंडाची चर्चा, पलटणीतील लोकांस पुरेसे रोजगार दिले असतां फितूर होणार नाही असा अंदाज, ६ डिसेंबर १८३२ (७६-७७) ; महाराज व मालकम यांचेवर लाच खाल्ल्याचा आरोप, १३ डिसेंबर १८३२ (८४) ; मुंबई येथील दारूखान्यास आग लावण्याचा प्रयत्न, १५ डिसेंबर १८३२ (८७) ; बायजाबाई शिंदे हिच्याशी बेबनाव, रूसवाल्यांच्या हालचाली, रूसवाले क्रूर आहेत असे मराठी माणसाच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न, २५ डिसेंबर १८३२ (९१) ; म्हैसूरच्या राज्यावर खोटे बालंट आणून त्याला बदनाम करण्याची रेसिडेंट याची कपटनीति, ११ फेब्रुवारी १८३३ (१४५-१४६) ; लखनौ येथील बंड करणाऱ्या लोकांस बंड न मोडल्यास लखनौ ताब्यांत घेऊ अशी इंग्रजांची धमकी, रूसवाल्यांच्या फौजेशी सामना करण्याची हिंमत रणजितसिंग याचे फौजेत आहे किंवा नाही याबाबत शंका, १९ मे १८३३ (२२३) ; रूसवाले यांच्या संभाव्य हल्याचा मार्ग, कौन्सिलांत हिन्दु लोक घेण्याचा विचार, १९ मे १८३३ (२२४) ; रूसवाल्यांच्या संभाव्य हल्यास तोंड देण्याकरितां प्रतापसिंह महाराजांकडे फौज आहे किंवा नाही याविषयी इंग्रजांची विचारणा, २३ जून १८३३ (२४६) ; पुणेकर व दक्षिणात्य ब्राह्मण यांच्यावर इंग्रजांचा संपूर्ण अविश्वास, १८ जुलै १८३३ (२७२) ; इंग्रज व मराठे यांच्या राजनैतिक संबंधाबाबत प्रतापसिंह महाराज यांचे सडेतोड व निभिड विचार, १४ ऑगस्ट १८३३ (३००).

**राज्यकारभार :**

बेकायदा जहाज वाहतुकीस बंदी, ३१ ऑक्टोबर व १ नोव्हेंबर १८३२ (३०), (३१) ; मुंबई व मद्रास येथे कौन्सिलस स्थापण्याबाबतचे विचार, ४ जानेवारी १८३३ (१००) ; लाचखाऊ नोकरांची योग्य प्रकारे कसून चौकशीची आवश्यकता, ६ जानेवारी १८३३ (१०७) ; राज्यांतील दरवड्यांचा बंदोबस्त, इंग्रजी व मराठी हुकुमांची अंमलबजावणी, ७ एप्रिल १८३३ (१८५) ; किरकोळ सूचनावजा पत्रे पुणे येथील एजंटाची इंग्रजीतून आल्याची नोंद, १९ एप्रिल १८३३ (१९४) उदेपुराहून शिवानंद शास्त्री यांचे वार्तापत्र, २४ एप्रिल १८३३ (२०२).

**सातारा शहर :**

शहर सातारा येथे नवीन पेठांची वसाहत, २३ नोव्हेंबर १८३२ (५७) ; शहरांतील बंदोबस्ताकरितां वयोवृद्ध माणसांची नेमणूक, १५ एप्रिल १८३३ (१९१).

(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**सामाजिक :**

भेटीप्रसंगी मानाप्रमाणे विडे देण्याच्या चालीरीती, १२ ऑक्टोबर १८३२ (६) ; गुलामगिरीची पद्धत नष्ट होत चालल्याबाबत, २९ ऑक्टोबर १८३२ (२८) ; जहागिरदाराने दत्तक घेऊ नये या नियमाचा भंग केल्याबाबत आप्पाजी निपाणीकर यांच्या जहागिरीच्या जप्तीचा हुकूम, १ डिसेंबर १८३२ (६९) ; तरुण मुलांतील बदफैलीपणाला आळा घालण्याचा प्रयत्न, २ डिसेंबर १८३२ (७१) ; तोरगलकर शिंदे यांची मुलगी व अक्कलकोटकर भोसले यांचा मुलगा शहाजी यांचा शरीरसंबंध जुळवून आणण्याची योजना, १७ जानेवारी १८३३ (११७) ; (११८) ; ज्ञाती व्यवहारांतील परस्पर संबंधांचे व त्यांतील मर्यादांचे सविस्तर विवेचन, २ फेब्रुवारी १८३३ (१३८–१४०) ; एल्फिन्स्टन व रॉबिन्सन यांच्याकडे मराठीतील ज्ञाती प्रकरणाविषईच्या नकलांची रवानगी, १८ फेब्रुवारी १८३३ (१५९) ; सामाजिक चालीरितीनुसार गायकवाड व शिर्के घराण्यांचे एकमेकांत लग्नसंबंध होण्याची अशक्यता, १७ मे १८३३ (२२१) ; जातीने पावन करून घेतल्याशिवाय स्वतःचे मुलाशीसुद्धां अन्नव्यवहार न करण्याचा अमरसिंग याचा निश्चय, १२ जून १८३३ (२३९) ; वकिलाच्या बंगल्यावरून घोड्यावर बसून जाण्यास बंदी, १५ सप्टेंबर १८३३ (३२६).

**पुडके क्रमांक २**

पत्र क्र. १९१२३, पृष्ठे सं. १-३१३

इ. स. २२ ऑक्टोबर १८३३—९ ऑक्टोबर १८३४.

(प्रतापसिंह महाराज सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

(२२ ऑक्टोबर १८३३ ते ९ ऑक्टोबर १८३४)

**जहागिरदार :** शहाजी भोसले अक्कलकोटकर यांची रेसिडेंट लॉडविक यांजकडे जेवणखाण्याचे बंदोबस्ताविषयी फिर्याद, २४ ऑक्टोबर १८३२ (३) ; बज्याबा निंबाळकर व सर्वोत्तम बाबुराव यांना वर्डिन यांस भेटण्यास बंदी, २५ ऑक्टोबर १८३३ (१०) ; सर्वोत्तम बाबुराव याचे सातारा येथून पुण्यास पलायन, १ नोव्हेंबर १८३३ (१९) ; अक्कलकोटकर यांच्या बंदोबस्ताबद्दल जॉन्सनची महाराजांस सूचना, २५ नोव्हेंबर १८३३ (४६).

**छत्रपति व रेसिडेन्ट :** गँट याच्या भेटीबाबत एल्फिस्टन याचे विलायतेहून पत्र, लॉडविक रेसिडेंट झाल्याबद्दल महाराज सरकारांत खुषी, २८ फेब्रुवारी १८३४ (१२६).

**छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :** **(खालील पृष्ठांची २२ ऑक्टो. १८३३ ते ९ ऑक्टो. १८३४ ही तारीख आहे.)**

**जमाबंदी :** ३८, ३९, ४१-४५, ४७-५९.

**जहागिरदारविषयक :** १४०-१४३, १६२, २३९-२५१.

**न्यायदान :** ११-१८, ८२-९१, ९३-१२५, १४९-१६१, १६३-१७३.

**राज्यकारभार :** १, २, ५, ९, २०-३१, ३३-३६, ६१-८०, १२९-१३८, १४५-१४६, १७५-१७७, १७९-१९६, १९८-२२२, २२४-२३८, २५२-२७३, २७५-२७९, २८१-२८३, २८५-२८६, २८८-३१३.

**धार्मिक :** ज्ञाती धर्मानुसार लोक न वागल्यास त्यांचेकडून दंड घेण्याचा विचार, ११ मार्च १८३४ (१४७).

**बातमी :** विलायतेत गुलाम लोकांचा दंगा होण्याचा संभव, ८ मार्च १८३४ (१४४),

**भारतीय संस्थाने :** हैद्राबादचे राज्य कंपनी सरकारचे मते चालवण्याची योजना, २४ ऑक्टोबर १८३३ (६); रणजितसिंग याजकडील वकील कलकत्त्यास लॉट साहेबांकडे जाणार असल्याची बातमी, २५ ऑक्टोबर १८३३ (७) ; निजामाच्या राज्यांत कंपनी सरकारने नेमलेल्या दिवाण चंदूलाल यांजकडून रयतेचा छळ, २५ ऑक्टोबर १८३३ (८) ; शिंदे यांच्या नावापुढे सरकार हे विशेषण लावण्यास इंग्रजांकडून मनाई, ९ नोव्हेंबर १८३३ (३२) ; ग्वाल्हेर येथे फितुरी व बंडवाल्यांचा बंदोबस्त, १४ नोव्हेंबर १८३३ (३७) ; भूजवाले नबाब वारल्यानंतर त्यांचा मुलगा व भाऊ यांच्यात परस्पर लढाई, १४ डिसेंबर १८३३ (६०) ; रणजितसिंग याचा आजार व शीख लोकांचे लुधियानांत आगमन होण्याची बातमी, १२ मार्च १८३४ (१४८) ; रणजितसिंग याजकडून मथुरेच्या ब्राह्मणांना शनिग्रहाच्या सुवर्ण पुतळ्याचे दान व त्यांची इंग्रजी हद्दीत पाठवणी, ब्रम्हदेशच्या जुलमी राजाच्या कारभारांत पडण्यास रेसिडेंट यास बंदी, १५ एप्रिल १८३४ (१७४) ; अजमेर येथे लॉट साहेबाचा जोधपूरच्या कारकुनाशी तंटा, राजा मानसिंग पदभ्रष्ट होण्याचा संभव व इंग्रजांशी लढाई करण्याचा संभव, २१ एप्रिल १८३४ (१७८) ; दौलतराव घोरपडे यांना पुण्यास घरीं राहण्याबद्दल इंग्रजांचा हुकूम, हरजी होळकर याने जुने कारभारी कैद करून त्याजकडे लावलेला पट्टीचा तगादा व इंग्रजांची त्याबाबत मुग्धता, १८ मे १८३४ (१९७) ; रणजितसिंग याचे मृत्युनंतर हिंदुस्थानांत लढाई होण्याचा संभव म्हणून रेसिडेंट याची महाराजांशी चर्चा, १९ जून १८३४ (२२३) ; हैद्राबादमध्ये प्रजेवर होणाऱ्या जुलमाचा बंदोबस्त करण्याची इंग्रजांकडे कामगिरी, ग्वाल्हेर येथे शिंदे यांच्या पलटणींत बंड, १९ ऑगस्ट १८३४ (२७४) ; जोधपूरकरांशी मुधोजी याची लढाई, ३१ ऑगस्ट १८३४ (२८०) ; जोधपूर येथे इंग्रज पलटण रवाना व सिंध नदीपलीकडे फौज जमा होणार असल्याची बातमी, ७ सप्टेंबर १८३४ (२८७).

राजकीय :

किल्ला व जलमंदिर बघण्यासाठी आलेल्या मुंबईच्या साहेबांची भेट न घेण्याबद्दल महाराजांस सूचना, १७ नोव्हेंबर १८३३(४०); इंग्रज दरबारांत येण्यास बाळाजीपंत नातू यास मनाइ, ४ सप्टेंबर १८३४(२८४).

राज्यकारभार :

ग्रँट याचा भाचा डॉक्टर पामलर यांस हिंदी शिकण्याची सूचना, २४ ऑक्टोबर १८३३(४); चीनचे मुलखांत व हिंदु देशांत पूर्ववत् कंपनीचा व्यापार चालू ठेवण्यासंबंधी विचार, २५ ऑक्टोबर १८३३ (७); आधारवाडी येथे विहिरी खणण्याचा हुकूम, वाघाची शिकार केलेल्या लोकांस बक्षीस, ९ जानेवारी १८३४(८१); प्रतापसिंग महाराजांचा एका वर्षाचा जमाखर्च, १ मार्च १८३४ (१२७-१२८); टांकसाळीतून पटवर्धन वगैरेकडून खोटया रुपयांची निर्मिती, ८ मार्च १८३४ (१३९).

शहर सुधारणा :

सातारा येथील आमदानी पुण्यापेक्षा चांगली असल्याबद्दल वॉर्डनच्या बायकोचे मत, १९ जून १८३४ (२२३).

---

पुडके क्रमांक ३

पत्र क्र. १९१२४, पृष्ठ सं. १-३६३ इ. स. ११ ऑक्टोबर १८३४—३० सप्टेंबर १८३५.

(प्रतापसिंह राजे सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी.)

छत्रपतींचे नित्याचे व्यवहार :

**(खालील पृष्ठांची ११ ऑक्टो. १८३४ ते ३० सप्टे. १८३५ ही तारीख आहे.)**

जहागिरदारप्रकरणी :

७, १०, १३, १६, १४६-१४७, १५७, १८२, २९४, ३३८, ३४१, ३४३-३४४, ३४८, ३५३, ३६१.

धार्मिक व सामाजिक :

९, २९, १२०, १३९-१४०, १७६, २१०, २१९.

महाराज व इंग्रज संबंध :

१५, ३०, ७३-७४, ८२, ११५, १२७, १३६, १३४, १३७-१३८, १४१, १५२, १६१-१६२, १६८, १७५, १७७, १७९-१८१, १८५-१८९, १९१, १९३-१९४, १९६, १९८-१९९, २०१-२०३, २०५, २०७-२०८, २११, २१४-२१५, २१७-२१८, २२६, २२८-२२९, २३२, २३५, २४३, २५३, २५५, २५७-२५८, २७३, २७५-२७६, २८०, २८३, २८५, २८९-२९०, २९२-२९३, ३०३, ३०५, ३०९-३१०, ३१२-३१३, ३२५, ३२७, ३५८-३५९.

महाराज खाजगी :

१९-२०, ३५-३६, ४०-४१, ५०-५१, ५३, ५५-५६, ७९, ९२, १०३, १५६, १५८, १६७, २२२, ३०८.

राज्यकारभार :

१-२, ८, १४, २५, २७-२८, ३१-३२, ३७-३९, ५४, ६१-६२, ७२, ७५-७८, ८०, ८३-८५, ८७, ९४-९८, १००-१०१, १०५-१०६, १०८-११४, ११६-११९, १२१-१२६, १२८-१३०, १३२-१३३, १४२-१४३, १४८, १५०-१५१, १५३, १५९, १६५-१६६, १७३, १८३-१८४, १९०, १९२, २०६, २०९, २१२-२१३, २२०-२२१, २२३-२२५, २२७, २३०-२३१, २३४, २३६-२४२, २४४-२४६, २४९-२५२, २५४, २५६, २६९-२७१, २७३-२७४, २७७, २७९, २८१-२८२ २८४, २८८, २९१, २९५, २९६-२९८, ३०१-३०२, ३०४, ३०७, ३११, ३१४, ३१६-३१८, ३२०-३२४, ३२६, ३२८-३३०, ३४०, ३४२, ३४६-३४७, ३५०-३५२, ३५५-३५७, ३६०, ३६२-३६३.

## दप्तर क्रमांक ४२, पुडके क्रमांक ३—चालू

**जहागिरदारप्रकरणी :**

रामराव डफळे याचा मृत्यु, जहागिरदाराच्या मृत्यूनंतर औरसपुत्र असतानाहि जहागिरीची जप्ती करण्याची पद्धत, ४ ऑगस्ट १८३५ (३३१–३३६).

(प्रतापसिह राजे सातारकर यांच्या रोजनिशीतील नोंदी)

**धार्मिक व सामाजिक :**

देशावर संकट येतेसमई श्री. त्र्यंबकेश्वरच्या कुंडातून ज्वाला निघत असल्याचे नाशिकहून आलेल्या गृहस्थाचे मत, १८ ऑक्टोबर १८३४(११) ; गुजर, मोहिते, पवार यांच्या गोत्रासंबंधी चौकशी, नोव्हेंबर १ १८३४(२४) ; शास्त्री मंडळाने निःस्वार्थीपणे ज्ञातीसंबंधी निर्णय देण्याची व मद्य, मांस सेवन करणारे व जातीबाह्य वर्तन करणारे ब्राह्मण यांच्याकडून दंड घेण्याची सूचना, १५ नोव्हेंबर १८३४(३३-३४) ; मोहिते व गुजर यांच्या सोयरिकेस मराठा जातीची मान्यता, १५ डिसेंबर १८३४(५९) ; ब्राह्मणांच्या दक्षिणेबद्दल इंग्रजांचा हुकूम, २० डिसेंबर १८३४ (६५) ; जमनाजी महाडिक याची कन्या व शिवाजी मोहिते नागपूरकर यांच्या सोयरिकेस ज्ञातीच्या तंटचामुळे अडथळा, १५ जानेवारी १८३५(८८) ; गायकवाडांचा जांवई कदम याचे कछवे क्षत्रियांबद्दल निवेदन, १७ जानेवारी १८३५(८९) ; नाना व रावजी महाडिक यांच्यावरील बहिष्काराबद्दल महाडिक मंडळी व ज्ञातीस ताकीद, शुद्राच्या संसर्गाबद्दल वाठारकर निंबाळकर यांनी प्रायश्चित घ्यावे म्हणून हरभट वाळिंबे याची विनंती, २१ जानेवारी १८३५ (९१) ; शुद्धिपत्र देण्याबद्दल वाठारकर निंबाळकर यांची महाराजांना विनंती, २५ जानेवारी १८३५(९३) ; वाठारकर निंबाळकर यांच्या शुद्धिपत्राबाबत आप्पासाहेब यांचे पत्र, २९ जानेवारी १८३५(१०२) ; सती जाण्यास इंग्रजांची मनाई, ३ फेब्रुवारी १८३५ (१०७) ; माहुली येथील श्री. भार्गवराम देवाची मूर्ती फोडल्याबद्दल इंग्रजांकडील संन्यास शिक्षा, १८ एप्रिल १८३५ (१७४) ; नीतिधर्माप्रमाणे चालण्याची शास्त्रांतील सूचना, १३ मे १८३५(२०४) ; धर्मप्रसारासाठीं व स्त्रियांच्या विद्याभ्यासासाठीं शाळेची सोय, १५ जून १८३५(२४७) ; सतीच्या चालीसंबंधी चर्चा, २० जून १८३५ (२५९–२६८) ; हिंदूंना बाटवून ख्रिस्ती करण्याचा इंग्रजांचा विचार व कर्नाटकांत पुष्कळ लोक बाटविल्याबद्दल बातमी, ३० जून १८३५ (२७८) ; यजुर्वेदी व ऋग्वेदी यांच्या कर्मासंबंधी चर्चा, क्षत्रियांचा सावित्री व ब्राह्मणांचा गायत्री मंत्र असल्याबद्दल मत, १७ जुलै १८३५ (३००) ; लग्नाच्या पद्धतीत सुधारणा करण्याची सूचना, ११ ऑगस्ट १८३५ (३१९) ; सप्तशतीच्या पाठाचे सरकारांत पठण, ५ सप्टेंबर १८३५ (३३७) ; चिमणाजी शिर्के यास जातीत ठेवण्यासंबंधी चर्चा, १४ सप्टेंबर १८३५(३४५).

**बातम्या :**

विलायत येथील पार्लमेंटची इमारत जळाल्याची, ११ मार्च १८३५ (१३५) ; कंपनी सरकारच्या व्यापारामुळे इतरांचे नुकसान होते म्हणून हिंदुस्थानांत कंपनीच्या व्यापारास बंदी घालण्याबद्दल व हिंदुस्थान अगर विलायतेतील व्यापार सर्वांना खुला ठेवण्याबद्दल विलायत बादशाहींत ठराव, छापखान्यामुळे हिंदु लोकांना देशावरच्या बातम्या समजून ते हुशार होतात म्हणून छापखाना बंद करण्याचा कलकत्त्यात कट, ४ ऑगस्ट १८३५(३१५).

**महाराज व इंग्रज संबंध :**

रॉबर्ट यांची गव्हर्नर पदावर नेमणूक, अमेरिकेच्या टापूवरील स्मिथ याची पूर्वीची गव्हर्नरपदावरील नेमणूक, गव्हर्नर क्ल्यारचे मुंबई येथे आगमन, १३ ऑक्टोबर १८३४(४–५) ; सरहद्द प्रकरणी महाराजांचे गव्हर्नरयास पत्र, मालकम याच्या स्मारकनिधीची रेसिडेंट यांजकडून महाराजांचेकडे मागणी, १४ ऑक्टोबर १८३४(६) ; गव्हर्नर भेटीची महाराजांची इच्छा, २७ ऑक्टोबर १८३४(१७-१८) ; अंडरसन विलायतला जाणार असल्यामुळे धारवाड येथील रेसिडेन्सीवर रीड याची नेमणूक, ३१ ऑक्टोबर १८३४(२२) ; महाराजांच्या राज्याच्या बंदोबस्ताबद्दल एल्फिन्स्टन याचे आश्वासन, १५ नोव्हेंबर १८३४(३३) ; आप्पासाहेब यांचे गैरवर्तन व नेमणुकेबद्दल महाराजांच्या सेनापतीजवळ रेसिडेंट याचे निवेदन, सरहद्द प्रकरणी लाडविक याचे महाराज यांना आश्वासन, बंड केल्याबद्दल अक्कलकोटकर शंकरराव सरदेशमुख यांस कैद करण्याची सूचना

**महाराज व इंग्रज संबंध : चालू—**

२५ नोव्हेंबर १८३४ (४२-४३) ; लांच खाल्याच्या आरोपाबद्दल लखनौ येथील रेसिडेंटची बडतर्फी व त्याबद्दल चौकशी, १ डिसेंबर १८३४(४७) ; सरहद्द प्रकरणीं बाळाजीपंत नातू याजकडून माहिती मिळविण्याबाबत क्ल्यार यास लिहावयाचे पत्र, विलायत येथे जाण्यापूर्वी जहागिरी प्रकरणी उलगडा करण्याबद्दल एल्फिन्स्टन यास विनंती, १५ डिसेंबर १८३४(५७—५९) ; वर्तन सुधारण्याबाबत आप्पासाहेब यांस सूचना, २० डिसेंबर १८३४(६४) ; महाराजांच्या राज्यकारभाराबद्दल इंग्रजांचे अनुकूल मत, पेन्शन व सरंजामासंबंधी मुक्तता, एक सालाच्या खर्चाइतकी रक्कम शिल्लक टाकणे व कंपनी सरकारच्या सल्याने वागणे याबद्दल ग्रँट याच्या महाराजांना सूचना, स्मीथ याच्या लष्करांत बाळाजीपंत नातू यास महाराजांनी पाठविलेले पत्र, २२ डिसेंबर १८३४ (६६—७०) ; रेसिडेंट लॉडविक याचे मुंबईला गमन व मुंबईचा गव्हर्नर विलायतला जाण्यापूर्वी सातारा येथे येणार असल्याचे पत्र, १४ जानेवारी १८३५(८६) ; मुंबईचा गव्हर्नर व सर्व ठिकाणच्या इंग्रज अधिकाऱ्याच्या बदल्या, गव्हर्नर क्ल्यार याचा विलायतला जाण्याचा बेत, बाळाजीपंत नातू याचा मुंबईला जाण्याचा विचार, २७ जानेवारी १८३५(९९) ; सरहद्द प्रकरणी एल्फिन्स्टन याजकडून माहिती मिळण्याबाबत महाराजांची विनंती, २३ मार्च १८३५ (१४४-१४५) ; मुंबइ येथील गव्हनर पदावर ग्रँट याची नेमणूक, २६ मार्च १८३५(१४९) ; एल्फिन्स्टन याजप्रमाणेच राज्याचा बंदोबस्त ठेवण्याबद्दलचे क्ल्यार याचे आश्वासन, ३० मार्च १८३५(१५४-१५५) ; क्ल्यार याचे पत्र तहनाम्यास जोडून जपून ठेवण्याची लाडविक याची महाराज यांना सूचना, ३ एप्रिल १८३५ (१६०) ; विलायतेत पहिल्या वजिराच्या जागी वेलस्ली याची नेमणूक, पूर्वी बोनापार्ट याचा चिटणीस असलेल्या म्हाताऱ्याची फरेंचांच्या देशांत मुख्य प्रधानकीवर नेमणूक, ७ एप्रिल १८३५(१६३) ; महाराजांनी कंपनी सरकारशी दोस्ती ठेवण्याबद्दल गव्हर्नर ग्रँट याची इच्छा, १३ एप्रिल १८३५(१६९-१७०) ; नागपूर येथील अधिकारी व नागपूर येथे आलेला रेसिडेंट यांचे मतभेद, २३ एप्रिल १८३५(१७८) ; निपुत्रिक असल्यामुळे महाराजांनी दत्तकपुत्र घ्यावा म्हणून लॉडविक याची सूचना, ९ मे १८३५ (१९५) ; निंबाळकर, अक्कलकोटकर, डफळे यांचे मुलख महाराजांनी घेतले तसेच महाराजांचे राज्य इंग्रज घेतील याबाबत चर्चा, २३ जुलै १८३५(३०६).

**महाराज खाजगी :**

शहाजी भोसले अक्कलकोटकर यांजकडून आलेल्या गडगणेराच्या आमंत्रणास महाराजांचा जबाब, १६ नोव्हेंबर १८३४ (३४); गडगणेरासाठीं खंडेराव शिर्के, रामराव मोहिते व नाना आगटे यांचेकडे महाराजांचे गमन, २८-२९ नोव्हेंबर १८३४ (४४-४५) ; शिर्के व मोहिते यांजकडील लग्नसमारंभाची माहिती, १ डिसेंबर १८३४(४६); महाराजांना भेटण्याच्या पटवर्धन यांच्या इच्छेबद्दल राघोपंत केशरकर याचेजवळ महाराजाचे उत्तर, २ डिसें. १८३४ (४८-४९) ; वरातीचा समारंभ, ६ डिसें. १८३४ (५२) ; विवाहाप्रित्यर्थ पाठविलेला आहेर स्वीकारण्याबद्दल चंदावरकर शिवाजीराजे यांचे महाराजांना पत्र, १ फेब्रु. १८३५ (१०४) ; उदेपूरकर राणाजी यास महाराजांकडून पोषाख रवाना, १३ एप्रिल १८३५ (१६९-१७०) ; राज्याभिषेकसमई लागणाऱ्या चारी समुद्राच्या पाण्यासंबंधी माहिती, २३ सप्टें. १८३५ (३५४).

**राजकारणी :**

सयाजी गायकवाड यांच्या नांवे शिक्क्यासह खोटी पत्रे रुसवाल्यास लिहून ती पत्रे धरून दिल्याबद्दल इंग्रज सरकारांतून बक्षीस मिळविण्याचा प्रयत्न केला म्हणून प्याकशा मुसलमानास इंग्रज सरकारांतून कैद, अयोध्या येथे कंपनी सरकारने अंमल चालविण्याबद्दल विलायतचा हुकूम, १३ ऑक्टो. १८३४ (३-४). जोधपूरवाल्यांचा इंग्रजांशी लढण्याचा निश्चय, सिंधवाल्यांचा जोधपूरकरांस मदत करण्याचा विचार, सिंधवाल्यांकडून सुज्यावलमुलुक याची खंडणी वसुली यासंबंधी बातमी, २० ऑक्टो. १८३४ (१२) ; सिंध व जोधपूर घेऊन रणजितसिंग, सिंधवाले यांना थक्क करून रुसवाल्यांचा हिंदुस्थानचे सहा सुभे जिंकण्याचा बेत हाणून पाडण्याचा इंग्रजांचा प्रयत्न, २० ऑक्टो. १८३४ (१७) ; नागपूर येथील कारभारासंबंधी नागपूरकर अधिकारी मुधोजी भोसले याच्या पत्रासह इंग्रजांकडे रवाना, २८ ऑक्टो. १८३४ (१८) ; विलायतच्या कारभारी मंडळाची रयतेकडून घालमेल, हुकूम दुसऱ्याचे स्वाधीन केल्यामुळे होणारा राज्य नाश, इंग्रजांचे जोधपूरवाल्यांशी लढण्यासाठीं प्रयाण व इंग्रजांच्या पराभवाच्या चिन्हाबद्दल मुंबईत बातमी, एल्फिन्स्टन

